# दोन शब्द

श्रीयुत बालकृष्ण मार्तण्ड दाभाडे उर्फ शशाङ्क यानी लिहिलेले 'झङ्काराचे पडसाद' हे पुस्तक मी वाचिले. नावावरून पुस्तकातील लेखांची किंवा विषयाची कल्पना होत नाही. लेखकाने वेगवेगळया १४ विषयावर आपले विचार माण्डले आहेत. या विषयापैकी बहुतेकांचा सम्बन्ध 'शिक्षण' विषयाशी आहे आणि म्हणूनच या पुस्तकावर दोन शब्द लिहिण्याची कामगिरी लेखकाने माझेवर सोपविलेली दिसते.

'शिक्षण' या शब्दाची व्याख्या अनेकानी अनेकरीतीने केलेली आहे. शिक्षणापासून काय साध्य व्हावयास पाहिजे, हे लेखकाने 'शिक्षणाची भूमिका' या लेखात उत्तमरीतीने प्रतिपादन केलेले आहे. व्यक्ति व समाज यांचे सम्बन्ध शिक्षणामुळे व्यक्तीस कळले पाहिजेत. हा सम्बन्ध लक्षात ठेवून जगात वागणे म्हणजेच धर्म-

पालन होय गेण्ढीला जसा आळा तसा समाजाला धर्म हा आळा आहे. समाजाला न ओळखता स्वार्थ साधणारा मनुष्य अधार्मिक होय

विद्यार्थ्यांना राजकारणापासून किंवा समाजापासून अलिप्त ठेवता येणार नाही, हाही मुद्दा श्रीयुत शशाङ्क यानी याच लेखात स्पष्ट केला आहे. या समजात लहान मुले वावरतात त्यापासून त्याला दूर ठेवता येणार नाही विद्यार्थी हा राष्ट्राच्या भविष्यकाळाचा नागरिक नसून वर्तमानकाळाचा नागरिक आहे. या भावनेने त्याचे हातून प्रत्यक्ष समाजोपयोगी कार्ये घडवून आणिली पाहिजेत.

मानसिक व वैचारिक स्वातन्त्र्य हा शिक्षणाचा महत्वाचा उद्देश साङ्गण्यात आला आहे. आपले शिक्षणास जर कशामुळे पङ्गूपणा आला असेल तर या उद्देशाप्रमाणे शिक्षण न दिल्या गेल्यामुळे खेड्या-पाड्यातून आज विचारास चालना दिली गेली पाहिजे. दुसऱ्याने साङ्गावे व आपण ते बरं वाईट न पाहता करावे, अशी प्रवृत्ति दिसते. छापील पुस्तके वाचणाऱ्या मुलांचीही हीच स्थिती. छापलेले कधी खोटे असू शकत नाही, हीच बहुतेक विद्यार्थ्यांची समजूत असते.

विचार जागृत करणाऱ्या शिक्षकाची आज हिन्दुस्थानाला फार जरूर आहे. इतर देशामध्ये मुलाना फारच स्वातन्त्र्य दिले जाते परन्तु आपल्याकडे त्याचा अभाव आहे स्वातन्त्र्य न मिळाल्यामुळे लहान मुलामध्ये कोणती शक्ति सुप्त आहे हे कळणे कठीण जाते व हे न कळल्यामुळे त्या शक्तीला जागृत करण्याचे कार्य होत नाही.

पाश्चिमात्य देशामध्ये अनेक शिक्षण-विषयक चळवळी निघाल्या आहेत व शिक्षणक्षेत्रामध्ये अजून निरानिराळे प्रयोग होत आहेत. अशाप्रकारचे प्रयोग हिन्दुस्थानात फार थोडे होतात; कारण त्यास लागणारा पैसा व लहानशा कार्याला वाहून घेणारी विद्वान मण्डळी आपणाकडे फारशी सापडत नाहीत. पाश्चिमात्य देशाप्रमाणे आपल्या-कडे शिक्षण चालावे असे पुष्कळाना वाटते परन्तु सर्व समाज सुधारल्या-

शिवाय शिक्षक तरी चाङ्गला कोठून येणार ! सर्वांनी आपला स्वार्थ साधावा, घरेदारे उभारावीत शिक्षकाने मात्र परामार्थाकरिता झटावे, त्यानी संसाराची कोणतीच हाव धरू नये अशी जनतेने इच्छा करणे चूक आहे.

शिक्षकाचे हातून पुष्कळ कार्य व्हावे असे सर्वांना वाटते पण ते कार्य का होत नाही याचा कोणी फारसा विचार करीत नाही. जसा रोज तसे काम, हा सृष्टीचा नियम आहे. मोटारीमध्ये पेट्रोल वापरण्याच्याऐवजी जर घासलेट घातले तर मोटार चालत नाही हे लोक ओळखतात, परन्तु हाडामांसाच्या शिक्षकाला काय देणे जरूर आहे म्हणजे त्याचे हातून कार्य चाङ्गले चालेल, याचा कोणीच विचार करीत नाही. शिक्षकांच्या अडचणींचा विचार झाल्याशिवाय शिक्षण सुधारण्याच्या कोणत्याच चळवळी फारशा यशस्वी होणार नाहीत; असा आमचा समज आहे.

मातृभाषेचे महत्व आज आम्ही ओळखू लागलो आहोत. हिन्दुस्थानचा भूगोल आम्हास ठाऊक नाही, मात्र हिन्दुस्थाना बाहेरच्या जगाची आम्हाला ओळख अधिक आहे, हे दोष पुस्तकात उत्तमरीतीने दाखवून ज्यामानाने आपणास अधिक स्वातन्त्र्य लाभेल त्यामानाने हे दोष सुधारणार आहेत हे श्री. शशाङ्क यांचे म्हणणे बरोबर आहे शरीरसौन्दर्याचे बाबतीत राष्ट्राचे आधार गणल्या गेलेल्या तरुणपिढीने काय करावयास पाहिजे हा इशाराहि लक्षात ठेवण्यासारखा आहे.

ग. दाभाडे यांचे विचार मननीय आहेत. राष्ट्र पुढे यावे यासाठी प्रत्येकाची धडपड दिसून येत आहे. आशावेळी या लेखांचा उपयोग समाजास होईल अशी आशा वाटते.

पुणें ६।४।१९३९ बा. ग. जगताप.

# विषयानुक्रम



# निवेदन


या सङ्ग्रहातील ४–५ निबन्ध इंग्रजी लेखावरून जरूर ते फेरफार करून अनुवादिले आहेत. शेवटच्या लेखास हिन्दी लेखाचा तर पहिल्या लेखास डॉ. खैर यांच्या एका ग्रन्थाचा अल्प आधार आहे. वरील सर्व लेखांच्या लेखकांचा मी ऋणी आहे. श्री. बाबूराव जगताप यांनी दोन शब्द लिहून दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

शशाङ्क

# झङ्काराचे पडसाद

## शिक्षणाची भूमिका

चालू विसावे शतक हे क्रान्तिशतक आहे. याची सत्यता सुरवातीच्या सदतीस वर्षातच पटू लागली आहे. जर्मनी, इटाली, स्पेन या राष्ट्रात घडून आलेल्या घटना, रशियामध्ये झालेली क्रान्ति, चीन, जपान, अबिसिनिया या देशात चालू असलेल्या घडामोडी व हिन्दुस्थानच्या मनोवृत्तीत घडून येत असलेला बदल या सर्वांकडे दृष्टी फेकल्यास चालू युगाची क्रान्तिसत्यता पटल्यावाचून रहात नाही. हिन्दुस्थानही क्रान्तीच्या मार्गावर आहे आणि लौकरच रशियाप्रमाणे हिन्दुस्थानात क्रान्ति घडविण्याचे कार्य नव्या पिढीच्या हातून होईल, असा तिला विश्वास उत्पन्न झाला आहे. याला कारण हिन्दुस्थानातील विषम परिस्थिति स्पृश्य आणि अस्पृश्य, सावकार आणि गरीब शेतकरी, भाण्डवलदार आणि मजूर, पाण्ढरपेशे आणि निरक्षर शेतकरी, याजमधील फरक – याजमधील विषमता – कुणाही विचारी मनुष्याच्या अन्तःकरणास पाझर फोडल्याशिवाय राहणार नाही. मलबार हिलवरील ते धनिकांचे बङ्गले व परळ मधील ते मजुरांचे कुत्र्याहून हीन दर्जाचे जीवन पाहिले असता कुणाच्या अन्तरास पीळ पडणार नाही ? सनातन्यांचे स्वैर व स्वतन्त्र जीवन व अस्पृश्याचे रूढीच्या शृङ्खलानी बद्ध असलेले दुःखी जीवन पाहिले असता यातील विषमता कुणाला बोचणार नाही ? आर्थिक, सामाजिक, धार्मिक, नैतिक सर्वच बाबतीतील विषमता शक्य तितक्या दूर व्हावी एतदर्थ नवीन पिढीचे प्रयत्न चालू आहेत.

**सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखमाप्नुयात् ॥**

अशी परिस्थिति उत्पन्न होण्याला समाजवादाची अत्यन्त आवश्यकता आहे. आजपर्यन्त भाण्डवलशाहीने धर्माची माण्डणी अशी केली की दलित वर्गांना पिळून आपली मात्र चैन चालावी. दलित वर्गांची पिळणूक, त्यांचे भेसूर दारिद्य, त्यांची अन्नान्नदशा यामुळे क्रुद्ध होऊन त्यानी क्रान्ति करण्यास तयार होऊ नये म्हणून त्याना धर्माच्या नावाखाली खोट्या, ढोङ्गी धर्माची गोळी चारण्यात आली. आजपर्यन्तचे दलितवर्गाचे अनेक उठाव येन केन प्रकारेण दाबून टाकण्याचे शिकस्तीचे प्रयत्न भाण्डवलदारानी केले. पण चालू क्रान्तियुगात हे त्यांचे प्रयत्न यशस्वी होतील असे वाटत नाही. मार्क्सने उत्पन्न केलेला समाजवाद वणव्यासारखा पसरू लागला आहे. यात भाण्डवलशाहीची राखराङ्गोळी होणार हे निश्चित. या वादाला तोण्ड देण्याकरता तो श्रुतिस्मृति पुराणातील अनेक प्राचीन कालची मोडकी तोडकी शस्त्रे घेऊन आजच्या बदलत्या परिस्थितीत सनातनी वीर बद्ध परिकर झाले आहेत. जोपर्यन्त शेतकरी आणि मजूर समाजात शिक्षणाचा प्रादुर्भाव झाला नाही ,तोपर्यन्त विजयोन्मादाचे हुङ्कार ते आनन्दाने सोडतील. पण एकदा का हे ज्ञानाचे फळ शेतकऱ्याना चाखायला मिळाले की ढोङ्गी धर्माचा उच्छेद झालाच म्हणून समजा.

कब आप खाकमे मुझको मिला नहि सकते
मेरे गुबारको लेकीन दबा नहि सकते

"आपण मला मातीत मिळवू शकत नाही असे थोडेच आहे! पण माझी माती फिरून उठू लागली तर तुझी तिला कसे खाली दडपू शकाल?" आज मार्क्सवाद भयङ्कर म्हणून भाण्डवलशाही तो दडपण्याचा प्रयत्न करील. पण सुशिक्षित शेतकऱ्यांच्या नसानसातून तो जेव्हा स्फुरू लागेल त्या वेळेस हे त्याचा प्रतिकार कसा करू शकणार? ही वेळ जवळ येणार याची शुभ चिन्हे नव्या पिढीला दिसून येत आहेत.

आजपर्यन्त समाजाचे शासन फक्त धर्म करतो अशी दिशाभूल धर्ममार्तण्डानी केली. परन्तु मानवी इतिहासाकडे पाहण्याचा चष्मा केवळ धर्म नसून अर्थही आहे ही विचारसरणी मार्क्सने चालू युगात प्रथमतः पुढे माण्डली. या आर्थिक चष्म्यातून जगातील सर्व घडामोडींच्या कार्यकारण भावांची मीमांसा बरोबर पटू लागली. कौटिल्याने सुद्धा जगातील प्रत्येक घडामोड नव्हे प्रत्यक्ष धर्मसुद्धा अर्थावर अवलम्बून आहे हे जाणले होते म्हणूनच तो म्हणतो " अर्थ मूलोहि धर्मः " जर आर्थिक परिस्थिति चांगली व सुप्रयुक्त असेल तर धर्म, राजकारण, कला, नीति यांचा उत्कर्ष होईल. आजकाल धर्माचा ऱ्हास झाल्यासारखा दिसत आहे याचे कारण ही आर्थिक परिस्थिति होय. ही आर्थिक परिस्थिति कशी सुधारेल इकडे लक्ष देऊन त्या मार्गाने अगोदर प्रयत्न व्हावयास पाहिजेत. प्रत्येक व्यक्तिमात्राला पोटभर अन्न व अङ्गभर वस्त्र कसे मिळेल अशी परिस्थिति उत्पन्न होण्याकरता काय करावयास पाहिजे याची स्पष्ट जाणीव मार्क्सने मानव समाजाला दिली. दलितवर्गाची – बहुजनसमाजाची – पिळणूक करून भाण्डवलशाही जगत असे. यन्त्रादि साधनसामुग्री ज्यांच्या ताब्यात, ते भाण्डवलदार मजुराना राबवून सम्पत्ति उत्पन्न करितात. अर्थात एकाचा स्वार्थ दुसऱ्याचे दुःखास कारणीभूत होणार हे उघडच आहे. मजुराना जास्तीत जास्त राबवून कमीत कमी मजुरी देऊन आपण अधिकात अधिक नफा कसा मिळवावा या विवंचनेत भाण्डवलवाला असणार. दलितवर्ग व भाण्डवलदारवर्ग यांची हिते परस्पर विरुद्ध गोष्टीत आहेत. म्हणून बहुजनसमाजाला – दलितवर्गाला – जर पुरेसे अन्नवस्त्र मिळावे अशी इच्छा असेल तर प्रथम ही यन्त्रादि साधनावरील सत्ता दलितवर्गाने आपल्या हाती घेतली पाहिजे व सर्व जमीन, उद्योगधन्दे, सम्पत्ति राष्ट्रीय मालकीच्या व्हावयास पाहिजेत. अशी क्रान्तिवादी विचारसरणी मार्क्सने पुढे माण्डली आणि ती बहु–

मान्य – दलितवर्गमान्य – झाली. हा समाजवाद आर्थिक परिस्थितीवर अवलम्बून असल्याने समाजनेत्यानी ते वेळीच ओळखून जर पुढील धोरण आखले तर त्यात समाजाचे हितच होईल हे विसरून चालणार नाही. समाजसत्तावाद हिन्दी संस्कृतीला मुळीच मानवणार नाही असा कित्येकजण आक्षेप घेतात परन्तु जोपर्यन्त जगातील सर्व भाण्डवल-दारांची वृत्ति एकच आहे तोपर्यन्त हा समाजवाद जगातील कोणत्याही राष्ट्राच्या मनोवृत्तीस जुळण्यासारखाच राहील. समाजात जोपर्यन्त आर्थिक विषमता व पिळणूक कायम आहे, गरिबाच्या श्रमाचा फायदा घेऊन त्याचे रक्तशोषण जोपर्यन्त निर्बंधपणे चालू आहे तोपर्यन्त या वादाशिवाय हिन्दुस्थानास तरणोपाय नाही. वस्तुतः गरिबांची पिळणूक करून त्यांच्या रक्तानी धनिकानी अथवा धर्मसत्तेने जगावे अशी आपल्या हिन्दु संस्कृतीची शिकवण नाही. सर्वांच्या सुखाकरता सर्वांनी झटावे, सर्वांना पोटभर अन्न व अंगभर वस्त्र मिळावीत अशीच विचारसरणी आमच्या पूर्व सूरींची आहे.

“ जीवन आणि समाज यांचा विचार करीत ‘ सर्वभूतस्थ आत्मानं सर्व भूतानि चात्मनि ’ या उच्च अध्यात्मतत्वाचे शिखर हिन्दी तत्वज्ञा-न्यानी गाठले. याच विचारस्वातन्त्र्याच्या प्रवृत्तीने सामाजिक जीवनाचा विचार करून “ राष्ट्राची अखिल सम्पत्ति समाजाच्या मालकीची असून सर्वसामान्य जनाना तिचा उपयोग झाला पाहिजे. ” या सामाजिक तत्वाचा कळस पाश्चात्य तत्वज्ञान्यानी गाठला. व्यक्तीचे अध्यात्मिक व भौतिक व्यक्तित्व सहस्त्रशीर्ष – अक्ष – हस्त -- पाद असलेल्या समा-जात विलिन झाले पाहिजे हे सामान्य तत्त्व दोन्हीही तत्वज्ञानाचे मुळाशी आहे.” अशा तेजस्वी विचारपरम्परेला आजचा हिन्दु समाज पारखा होऊन भलभलत्या स्वार्थी, कोत्या, हीन विचाराना धर्म समजून समाजाची दिशाभूल करण्याचा प्रयत्न होत आहे. ज्या समाजास सर्व व्यक्तींना सुख प्राप्त करून घ्यावे या दृष्टीने प्रयत्न केला तर तो

अयोग्य आहे, असे म्हणणारा मनुष्य एकतर निर्बुद्ध असला पाहिजे किंवा ढोङ्गी, स्वार्थी तरी असला पाहिजे. समजातील प्रत्येक व्यक्तीला पुरेसे अन्नवस्त्र मिळावे, सुखाची सर्व साधने सहज साध्य व्हावीत, चित्रकलादि ललित कलांचा हक्काने उपभोग घेता यावा, सर्व तऱ्हेची वैद्यकीय साधने प्रत्येकास उपलब्ध असावीत अशा तऱ्हेचा समाज निर्माण व्हावा हा सर्व धर्मांचा एकमेव हेतू आहे. अशा तऱ्हेचा समाज निर्माण करण्याचा प्रयत्न आज रशियात चालू आहे. तिकडे डोळेझाक करून भागणार नाही. हिन्दुस्थान आणि रशिया या दोन राष्ट्रांमधील साम्य कौतुकास्पद व विचारणीय आहे. अफाट देशविस्तार, भाषा-वैविध्य, अशिक्षित बहुजनसमाज, धर्मसत्तेने चालविलेला अनन्वित छळ, भाण्डवलदारवर्गांनी अज्ञानी शेतकऱ्यांची व मजुरांची चालविलेली गळचेपी वगैरे सर्व दृष्टींनी विचार केला तर भेदापेक्षा साम्यच जास्त आढळून येईल. म्हणून हिन्दुस्थानची आर्थिक परि-स्थिति सुधारण्यासाठी आपण कोणत्या मार्गाने प्रयत्न करावयास हवा ही कल्पना येण्यासाठी रशियन क्रान्तिची भूमिका आपल्या डोळ्यापुढे ठेवावयास हवी. मात्र आपल्या समाजरचनेकडे, संस्कृतीकडे, आचार विचाराकडे नीट लक्ष देऊनच युक्त ती उपाययोजना अमलात आणली पाहिजे. केवळ डोळे झाकून तिकडची नक्कल इकडे उठाविणे केव्हाही घातूकच ठरणार. वरील गोष्ट लक्षात घेऊन ज्या शिक्षणाने आपण अन्नवस्त्राच्या बाबतीत स्वावलम्बी होऊ, असा आपला शिक्षणक्रम आखला तर आपणाला समाजाचे आत्यन्तिक हित साधता येईल. " सहनाववतु, सहनौ भुनक्तु, सहवीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीत-मस्तु । मा विद्विषावहै " अशा उच्च ध्येयाचे -- तेजाचे -- आमचे शिक्षण होते हेही विसरून चालणार नाही. आजही पुन्हा सर्वांना अन्नवस्त्र मिळून आत्मविकासास पूर्ण स्वातन्त्र्य मिळण्यास शिक्षणाची दिशा कशी असावी याबद्दल थोडक्यात विवेचन करीत आहे.

आज शिक्षणाचा प्रमुख उद्देश समाजनिष्ठा उत्पन्न करणे हा होय. व्यक्तिनिष्ठेचा काळ गेला असून समाजनिष्ठेचा काळ आला आहे. या ठिकाणी रशियामध्ये घडलेल्या दोन गोष्टींची मला स्मृति होते.

एकदा एक इंग्रज गृहस्थ एका रशियन प्राथमिक शाळेत गेला होता. शाळेचे अवलोकन करीत तो एका बालवर्गात गेला. तेथे त्याने मुलाना सहज एक गणित घातले. 'एका व्यापाऱ्याने रुपयास दहा शेर-प्रमाणे ८० रुपयाचे तादूळ घेऊन ते त्याने रुपयास ५ शेराप्रमाणे विकले; तर त्या व्यापारात त्याला काय लाभ होईल ?' गणीत किती साधे ! हिन्दी विद्यार्थ्याने चटकन '८०' म्हणून उत्तर दिले असते. कारण आमची शिक्षण पद्धतीच तशी. पण रशियन मुलानी -- वर्गात तीस मुले होती त्या सर्वांनी -- दिलेली उत्तरे भिन्न भिन्न होती. एकाने लिहिले. "अशा व्यापाऱ्याला बन्दुकीच्या गोळीने ठार मारावे." दुसऱ्याने लिहिले "त्याला चौकात फासावर लटकवावा." तिसऱ्याने लिहिले, "असा फायदा घेण्यास सरकार काय झोपले आहे ?" सर्वांची उत्तरे या नमुन्याची. यावरून काय बोध घ्यायचा ? स्वतन्त्र राष्ट्रात -- मजुरांच्या राष्ट्रात -- अशा उच्च विचाराने प्रेरित होऊन शिक्षण दिले जाते. तेथील मुलेसुद्धा अशीच तडफदार विचाराची! एकदा एक रशियन शेतकऱ्याने सामुदायिक गटातील धान्य घरी खाण्यासाठी चोरून आणले. तर त्या शेतकऱ्याच्या दहा बारा वर्षांच्या मुलीने ही बातमी सरकारात देऊन राष्ट्रघातकी बापास शिक्षा करविली. तिचा स्टॉलिनने मोठा गौरव केला. अशी तेजस्वी पिढी -- समाजाच्या हितासाठी तन मन धन अर्पण करणारी पिढी — अधार्मिक अनीतिमान समजल्या जाणाऱ्या रशियात निर्माण होत आहे. व्यक्तिधर्माहून समष्टि धर्माची उपासना करणाऱ्या रशीयात धर्म नाही म्हणून गिल्ला करणाऱ्या धूर्तांच्या ढोङ्गी धर्मांकडे नवीन पिढीने कानाडोळाच केलेला बरा. सर्व शिक्षणाचा पाया समष्टीच्या उन्नतीची दृष्टी ठेवूनच

रचावयास पाहिजे हे या कालात विसरून चालणार नाही. धार्मिक चळवळीचा रोख बहुजनाची स्थिति सुधारण्याकडेच्च वळविला पाहिजे. या कामाची थोडी कल्पना आर्य समाज संस्थेच्या कार्यावरूनच येईल. वैयक्तिक मोक्षाची वाट दाखविणाऱ्या या हिन्दुधर्माने यापुढे ही समाजदृष्टी ठेविली पाहिजे. वैयक्तिक मोक्ष व सामाजिक मोक्ष अशा दोन ध्येयाची सांगड घातली तरच या धर्माच्या निशाणाखाली नवीन पिढीचे तरुण जमा होतील.

विद्यार्थीदशा सम्पेपर्यन्तचे आयुष्य हे राजकारणापासून अथवा समाजापासून अलिप्त अशा वातावरणात जावे असे कित्येकजण प्रतिपादितात. या आवधीत विद्यार्थ्यांना व्यवहारातील व समाजातील कठोर वातावरणाची झळ लागू नये, पालकानी अथवा समाजाने पैसे पुरवावेत व तरुणानी फक्त पुस्तकी अभ्यास करावा. द्रव्यार्जन करण्याचे समाजातील कष्ट काय असतात याची कल्पना त्याना येऊ नये. "बाबानो उद्या तुम्ही नागरिक होणार ! तयारी करा" असा त्याना नित्य उपदेश केला जातो. जणू कांही नागरिकत्वाचे प्रथम नुसते ज्ञान करून घ्यायचे, ही गोष्ट मानवीस्वभावाचे विरुद्ध आहे. ज्ञान आणि कर्म याची साङ्गड एकाच वेळी घातली गेली पाहिजे. कर्म करीत असता त्याचे ज्ञानात रूपान्तर होत असते. उलट ज्ञानाची उपकारक प्रतिक्रिया कर्मावर होत असते. पुस्तक पठणरूप कर्माने ज्ञान मिळताच ते कर्म सम्पते. ज्ञानानि सर्व कर्मानि भस्मसात् कुरुते । ज्ञान मिळताच ते क्षेत्र मोठे होते व नवे कर्म सुरू होते. पुन्हा त्या कर्माने जे अनुभव-ज्ञान मिळते ते मिळताच ते कर्म सम्पलेले असते पुढे नवे कर्म सुरू होते. विद्यार्थी अवस्थेत जर विद्यार्थी नागरिक या नात्याने व जबाबदारीने आपले कर्तव्य करतील तरच ते पुढे आपली जबाबदारीची कामे निश्चि-तपणे पार पाडतील याकरता विद्यार्थ्यांना प्रत्येक अवस्थेत त्यांच्या मगदुराप्रमाणे सार्वजनीक कामे लावून दिलेली असावीत. या दृष्टीने

गेल्या पंधरावीस वर्षांत रशियन तरुणानी आपल्या समाजाची उपयुक्त अशी मोठी कामगिरी केली आहे. अखिल निरक्षर समाजाला एक तपाचे आवधीत साक्षर करण्याचे जे अपूर्व कार्य रशियात झालेले आहे त्याचे बहुतेक श्रेय रशियन विद्यार्थिवर्गाला आहे. हायस्कूल मधील १५ वयाच्या मुलामुलींनी चाळीस पन्नास वयाच्या वयस्क नागरिकाला लिहिण्यावाचण्यास शिकविले आहे. रशियातील सर्व शेती सरकारी मालकीची करण्याचे कामी पंचवीस हजार तरुण विद्यार्थ्यांची मदत झाली आहे. ठिकठिकाणी समाजोपयोगी अशी कामे विद्यार्थ्यांनी केली आहेत आपापला अभ्यास चालू असता निरनिराळया फॅक्टरीमध्ये विद्यार्थी कामे करीत आहेत. या ठिकाणी औद्योगिक संशोधन व सुधारणा करण्याचे काम त्यांचेकडून होत आहे. सारांश आपण समाजाचे एक जिवन्त घटक आहोत व त्या दृष्टीने आपले हातून कर्तव्य झाले पाहिजे. ही भावना जशी रशियन तरुणांची आहे तशी भावना आपल्या तरुणांच्या ठिकाणी उत्पन्न करून त्या तऱ्हेचे आचरणही त्यांचे हातून घडेल अशी परिस्थिति उत्पन्न व्हावयास नको का ? या दृष्टीने शिक्षणक्रमात सकाळी बौद्धिक शिक्षण, दुपारी शेतकी अगर औद्योगिक व रात्री सांस्कृतीक अथवा कलात्मक शिक्षण देण्याची तजवीज करावी. साहित्यसङ्गीतादि कलांच्या साहाय्याने प्रत्येक व्यक्तीने आपला विकास करून घ्यावा, या करिता कला सम्पादनाची साधने प्रत्येकाच्या आटोक्यात आणून देण्याचा सरकारने प्रयत्न केला पाहिजे. त्यामुळे बहुजन समाज कलाप्रेमी व रसमर्मज्ञ झाल्यास संस्कृतिसंवर्धनाचे कार्य सहज सुलभ होईल.

ज्ञानार्जन हे जातीभेदातील असावे. ज्ञान घेणारी प्रत्येक व्यक्तीही त्यावेळी सामान दर्जाची असावी. हा अस्पृश्य, हा मराठा, हा ब्राह्मण अशातऱ्हेचे विकल्प मनात न आणता ज्ञानामृत प्राशन करण्यास मुक्तद्वार असावे. मनुष्याला आपली कर्तबगारी वाढविण्याचे व आत्य-

न्तिक श्रेय प्राप्त करून घेण्याचे साधन म्हणजे ज्ञान ते प्रत्येकाच्या आटोक्यांत ठेवल्यास प्रत्येक कर्तबगार व्यक्तीस पुढे येण्यास सन्धी मिळावी. प्रत्येक विद्यार्थ्यांच्या कर्तबगारीस व आत्मविकासास पूर्ण सन्धी मिळाली पाहिजे. 'त्याला सन्धी तर द्या give him a chance' ही अमेरिकन स्वभावाची निदर्शक ह्मण आपली का होऊ नये? समाजात सर्व शिक्षण सुलभ करून सर्वांना विद्येचे मुक्तद्वार असावे. प्रत्येकजण काही वर पोहोचू शकत नाही. परन्तु तेथे पोहोचण्याची आपणाला सन्धी आहे या कल्पनेनेच समाजात एकतऱ्हेचे समाधान राहते.

Dignity of labour हे तत्त्व प्रत्येक विद्यार्थ्यांचे अन्तःकरणावर कोरण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. आजकाल जातिभेदाच्या कल्पनेने अमुक एक काम करणे हे उच्चतेचे लक्षण आहे व अमूक एक काम करणे हीन दर्जाचे आहे अशा तऱ्हेची घातुक प्रवृत्ति समाजात उत्पन्न झाली आहे. एतदर्थ प्रत्येक विद्यार्थ्यांत स्वावलम्बनाची शक्ति उत्पन्न होऊन मेहनत मजुरीत सर्वांस प्रथम स्थान मिळाले पाहिजे. घाम गाळून मजुरी करणारा हा श्रेष्ठ जातीचा ठरून आयत्या पिठावर रेघा ओढून स्वस्थ बसणारा – गरिबांच्या श्रमावर पुष्ट होणारा – हीन दर्जाचा, ही विचारसरणी प्रसृत झाली पाहिजे. महात्मा गान्धींनी अनेकवेळा भंग्याची कामे केली आहेत. मजुरीचे महत्व पटून आपल्या मुलाना आर्थिक स्वतन्त्रता प्राप्त करून देणारे शिक्षण मिळविण्यास हवे. प्रत्येक विद्यार्थ्याने शिक्षण घेताना स्वतः काहीतरी कष्ट करून अर्थोत्पादन करावयास हवे व त्याना ते साध्य होण्यास सरकारने तशी परिस्थिति निर्माण करावी.

शिक्षणाचा माझ्या मते एक महत्वाचा उद्देश म्हणजे मानासिक व वैचारिक स्वातन्त्र्य होय. आजकाल धर्माच्या नावाखाली विचार स्वातन्त्र्याची गळचेपी करण्याचा प्रयत्न होत आहे. कोणीही तरुण आपले विचार निर्भयपणे समाजापुढे माण्डू लागल्यास धर्म बुडाला

अशी हाकाटी अकारण करण्यात येते. आज हिन्दुस्थानात धर्माची छाप कमी होत असलेली दिसून येते, याचे कारण आपण विचाराचे दृष्टीने दोन हजार वर्षापूर्वीच्या धार्मिक वातावरणात विहार करतो व प्रत्यक्षमात्र विसाव्या शतकातील भौतिकशास्त्र, समाजशास्त्र व मानवशास्त्र यांच्या वातावरणात आहोत ह्मणून एकदम विरोध वाटतो. एकात अन्धश्रद्धा प्रधान आहे आणि स्वतन्त्र बुद्धीला येथे वावच नाही तर दुसऱ्यात बुद्धिवाद, प्रयोगवृत्ति, प्रत्यक्ष अनुभव या गोष्टी प्रधान आहेत व त्यांत बुद्धीला अधिक जिवन्तपणा वाटतो. इतर ज्ञानक्षेत्रे ज्याप्रमाणे बुद्धि-प्रधान झाली तद्वत् धर्माची वाढ झाली नाही. जगामध्ये मानवजातीचे परस्पर दळणवळण मर्यादित होते. अशा वेळी निरनिराळ्या काळी व स्थळी जो जो आध्यात्म विचार उत्पन्न झाला त्याला धर्म असे नाव दिले गेले. आज जगातील भौतिकशास्त्रज्ञ परस्पराशी सहकारितेची वृत्ति ठेवून सर्व शास्त्रे एकच मानतात. सर्व धर्मांचे मुळाशी असलेले अध्यात्म-शास्त्र एकच शास्त्र आहे असे मानून शास्त्रीयदृष्टीने ते वाढविण्याचा सर्वांनी प्रयत्न केला पाहिजे. भौतिक शास्त्रात पूर्व शास्त्रज्ञानी कायम सिद्धान्त म्हणून शोधलेले असले तरी पुढे येणारे शास्त्रज्ञ आपल्या शोधानी ते सिद्धान्त बदलू शकतात किंवा नवीन सिद्धान्त शोधून काढतात. तीच प्रवृत्ति अध्यात्मशास्त्रात स्वीकारली पाहिजे. आह्मी या धर्मसिद्धान्तात काही वाढ करू शकणार नाही ही वृति सोडून द्यावी. पूर्वीचे सिद्धान्त पारखून ते खरेखोटे ठरविले पाहिजे व त्यात आपल्या विचाराने अधिक भर घालता येणे शक्य आहे अशी नवी दृष्टी ठेविली पाहिजे. धर्माची अखेर तत्वे सर्वच शोधली गेली नाहीत. आपणालाही तत्वसंशोधनास अवसर आहे असे तरुण पिढीला वाटत आहे. जी संशोधनवृत्ति व स्फूर्ति धर्म निर्माण करणाऱ्या पूर्वऋषीत होती ती आजच्या पिढीत आहे असा आत्मविश्वास तरुणपिढीत उत्पन्न केला तर धर्माचे स्वरूप विकासी राहील. वरील गोष्टी लक्षात घेऊन

शिक्षणात मानसिक व वैचारिक स्वातन्त्र्याची जरूरी आहे याची कल्पना येईल असे वाटते.

वरील विवेचनाचा थोडक्यात गोषवारा पुढे देत आहे.

१ जगाच्या उत्पत्तीपासून आतापर्यन्तच्या सर्व घडामोडींचा पाया धर्म व अर्थ आहे. अर्थ मूलोहि धर्मः । ही विचारसरणी हिन्दी मनोवृत्तीस विरोधी नाही.

२ शिक्षणाचे ध्येय आर्थिक परिस्थिति सुधारणे हे पाहिजे. आर्थिक स्थिति सुधारल्यास धर्म, राजकारण, कला, नीति इत्यादींची स्थिति सुधारेल.

३ व्यक्तीबरोबरच समष्टीचा ऐहिक व पारलौकिक मोक्ष कसा साधेल ही दृष्टी शिक्षणक्रमात असावी.

४ प्रत्येक व्यक्तीला आत्मविकास करून घेण्यास पूर्ण स्वातन्त्र्य असावे. त्याला धार्मिक, सामाजिक, आर्थिक बन्धने आड येऊ नयेत.

५ Dignity of labour हे तत्त्व अङ्गात बाणून ते कृतीतही उतरावे, ह्मणून शेतकी, औद्योगिक शिक्षण सक्तीचे असावे. प्रत्येकाला स्वावलम्बनाच्या आश्रयाने आर्थिक स्वातन्त्र्य मिळवता यावे.

६ विद्यार्थी हा राष्ट्राचा भविष्यकाळचा नागरिक नसून वर्तमानकाळचा नागरिक आहे, या भावनेने त्याचे हातून प्रत्यक्ष समाजोपयोगी कार्ये घडवून आणली पाहिजेत.

७ साहित्यसङ्गितादि ललितकलांपैकी आवडीच्या कलांचा अभ्यास अवश्यक असावा.

८ प्रत्येकास मानसिक व वैचारिक स्वातन्त्र्य असावे.



# चालू शिक्षणपद्धति

" Our System of Education refuses to admit that children are children. Children are punished because they fail to behave like grown up people and have inpertinence to be noisely childish ... Thus the child becomes the battle ground for a fight between the school master and Mother Nature herself. "

**Rabindranath Tagore.**

शिक्षण म्हणजे विकास असे ह्मणावयास मुळीच प्रत्यवाय नाही. ज्याच्या योगाने विद्यार्थ्यांचे अन्तःकरण, बुद्धी व शरीर आतून व बाहेरून पुष्ट व सतेज बनून या तिन्हीचाही स्वाभाविक अन्तर्बाह्य विकास होईल, तेच खरे शिक्षण. विद्यार्थ्यांचे ठिकाणी असलेल्या सुप्त शक्तीचा विकास होईल अशा रीतीने चालना देऊन त्या विद्यार्थ्यांची प्रगति घडवून आणणे हे शिक्षणाचे अत्युच्च ध्येय असूनही चालू शिक्षणक्रमामधून तयार होणारी बलहीन, स्वार्थी व ध्येयशून्य विद्यार्थ्यांची पिढी पाहून मनाला फार खेद होतो. अशा रीतीची पिढी उत्पन्न होण्यास मुख्यतः चालू शिक्षणपद्धति व हल्लीचे शिक्षक कारण आहेत हे बहुंशी खरे आहे. एवढ्याचकरिता या लेखात शिक्षक आणि चालू शिक्षणपद्धति यामधील काही ठळक दोष दाखविण्याचा माझा विचार आहे.

ज्याच्या योगाने हिन्दी लोकांची मनोवृत्ती नोकरीकडे वळेल, अशा रीतीचे शिक्षण प्रथमतः या देशात सुरू करण्यात आले. हा शिक्षणाचा हेतु मात्र सफल झालेला दिसून येतो. या शिक्षणाने विद्यार्थ्यांच्या हृदयात स्वदेशाभिमानाची ज्योत पेटविली जाते असे

वाटत नाही. प्रत्यक्ष उदाहरणानेच ही गोष्ट सिद्ध करावयाची असल्यास आकड्यानिशी असे स्पष्ट दाखविता येईल की राष्ट्रीय विद्यालयातून बाहेर पडलेल्या व पडणाऱ्या विद्यार्थ्यांपैकी शेकडा जितके लोक प्रसङ्गी देशाच्या उपयोगी पडले, त्यापेक्षा सरकारी शाळातून शिकविणाऱ्या व शिकलेल्या लोकांचे देशाच्या उपयोगी पडण्याचे प्रमाण अत्यन्त अल्प आहे ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. साम्प्रत चालू असलेल्या शिक्षणाची उभारणी ही आमचे बुद्धिस्वातन्त्र्य व मानसिक स्वातन्त्र्य पूर्णपणे हिरावून घेण्याकरताच केली असल्याचा पदोपदी भास होतो. एवढ्याकरताच हा शिक्षणक्रम बदलण्याचा प्रयत्न देशातील शिक्षणाभिमानी करीत आहेत ही आमच्या सुदैवाची गोष्ट आहे.

चालू सदोष शिक्षणपद्धतीबरहुकूम शिक्षण देणारे जे शिक्षक आहेत त्यांचाही प्रामुख्याने विचार केला पाहिजे. हल्लीचे बहुतेक सर्व शिक्षक देशकालपरिस्थितिकडे न पाहता डोळे मिटून ठराविक पुस्तकातील ठराविक साच्याचे शिक्षण देणारे पगारी नोकर अतएव शिक्षक या पदवीला नालायख असेच ह्मणणे क्रमप्राप्त आहे. विद्यार्थ्यांना शिकविताना आपल्या शिक्षकाचा पहिला दोष म्हणजे मुलाना अकाली व अयोग्य वेळी मदत करण्याची प्रवृत्ति होय. याच्या योगाने स्वतः समजूत करून घेण्याची त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति नाहीशी होऊन मुले प्रायः परावलम्बी बनतात. परावलम्बीपणाचे लहानपणापासून शिक्षण मिळाल्याने हेच पोपट पुढे व्यवहारशून्य निपजत असतील यात नवल नाही.

साम्प्रतकाली शिक्षक हा हृदयस्थ प्रेमाच्या व सहानभूतीच्या जोरावर मुलाना मार्ग दाखवीत नसून छडीच्या व अधिकाराच्या जोरावर त्याना आपल्या ह्मणण्याप्रमाणे वागण्यास भाग पाडतो. यामुळे मुलात व शिक्षकात प्रेमाचा सम्बन्ध मुळीच रहात नाही. मग शिक्षकाविषयी मुलाचे मनात आदर कुठून राहणार? शिक्षकाच्या प्रेमळ

स्वभावाने व सहानुभूतिने जी मुलामध्ये शिस्त व जो आदर राहील तो अधिकाराने अथवा शिक्षेने बिलकूल रहात नाही. **रवीन्द्रनाथ टागोर** आपल्या ' School Mastar ' या एका लेखात ह्मणतात – " आपण मुलाना चाङ्गली शिस्त लावणारे आहोत अशी पुष्कळ शिक्षकाना घमेण्ड असते. खरोखर असे शिक्षक -- असेच पुष्कळ असतात -- उपजतच जुलमी असतात असे ह्मटले पाहिजे. आपल्या जुलमी स्वभावाचे कोड पुरविण्यासाठी हे शिक्षक असाहाय्य अशा लहान मुलाच्या वर जुल्म करून आपली शिस्त त्यांचेवर लादतात. ज्याचा कधीहि उपयोग होणार नाही असा कण्टाळवाणा अभ्यास ते लहान मुलांच्या पाठीमागे लावून त्यांच्या मानसिक व बौद्धिक शक्तीचा ऱ्हास करतात. वाटेल त्या प्रकारच्या क्रुर शिक्षा मुलाना देऊन त्यातच ते आनन्द मानतात. अशा तऱ्हेच्या शिक्षकाचे हातून राष्ट्राभिमानी तरुण विद्यार्थी कसे उत्पन्न होणार बरे ? " असे शिक्षक असल्यावर लहान मुले आपली अन्तःकरणे शिक्षकाजवळ केव्हां आणि कशी उघडी करणार ? एवढ्याचकरता शिक्षकाने मुलाना सहानभूतीच्या व प्रेमाच्या बन्धनाने जखडले पाहिजे. लहान मुले जरी चुकली तरी त्याना कधीहि खिजवू नये अथवा वाईट शब्दानी टोचून बोलू नये. त्यायोगे त्यांच्या नाजूक व हळव्या मनाला धक्का बसण्याचा सम्भव असतो.

चालू शिक्षणपद्धतीप्रमाणे प्रत्येक विषयाला वेगवेगळा शिक्षक असल्याने प्रत्येक शिक्षक येन केन प्रकारेण आपल्या विषयात मुले तयार आहेत असे वरिष्ठाना दाखविण्याकरता मुलावर निरनिराळ्या वह्या लिहून आणण्यासाठी व अभ्यासासाठी जबरदस्ती करतो. धाकदपटशाने काम न भागल्यास वेळप्रसङ्गी छडीचाही उपयोग करतो. अशा रीतीने आपापला विषय चाङ्गला करवून घेण्याविषयी प्रत्येक शिक्षकात अप्रत्यक्षपणे चुरस लागून राहते. या योगाने ती

गरीब बिचारी मुले जबरदस्त दडपणाखाली चिरडून जाऊन त्यांची बुद्धी बोथट होते. ठराविक वेळात नेमून दिलेले अभ्यास सम्पलेच पाहिजेत असे बन्धन असल्याने शिक्षकांची व मुलांची तारांम्बळ उडते. नेमून दिलेला अभ्यासक्रम सम्पला आहे असे वरिष्ठाना दाखविण्याकरिता शिक्षक कसा तरी अभ्यास सम्पवून टाकतो. वास्तविक एकच विषय ग्रहण करण्यास प्रत्येक मुलाला सारखाच वेळ लागतो असे नाही. काही मुलाना तो लवकर समजतो तर काहींना समजत नाही. यात कुणाकडेच दोष येत नाही. तरी पण शिक्षकाला नेमून दिलेला अभ्यास ठराविक वेळात सम्पविण्याची ताकीद असल्याने काही मुलाकडे शिक्षकाला जाणूनबुजून दुर्लक्ष करून पुढे झटकावे लागते. यामुळे काही मुलास अकारण मन्दबुद्धी असल्याबद्दलचा कायमचा ठसा मिळतो.

एका वर्गातील सर्व मुलांची बुद्धिमत्ता सारख्या दर्जाची नसते असे मानसशास्त्रवेत्त्यानी सोदाहरण सिद्ध करून दाखविले आहे, असे असताना कमिजास्त बुद्धिमत्तेच्या विद्यार्थ्यांना ठराविक वेळात अनेक विषयांचा अभ्यास करावयास लावणे हे चुकीचे आहे. कित्येक विषय तर असे असतात की पुढे त्याचा व्यवहारात कधीच उपयोग होत नाही. या विषयांचे ज्ञान विद्यार्थ्यांच्या डोक्यात भरण्याचा प्रयत्न करणे ह्मणजे एका दृष्टीने त्यांच्या बुद्धीचा नाश आणि वेळेचा दुरुपयोग करण्यासारखे आहे. वास्तविक समाजाला ज्या तऱ्हेच्या शिक्षणाची अत्यन्त जरूरी आहे त्या तऱ्हेचे शिक्षण देण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. या बाबतीत रशियातील कम्युनिस्टानी आखलेले धोरण व चालविलेला धडाडीचा प्रयत्न विचारणीय आहे. दुर्दैवाने असे धोरण इकडे आखले नसल्याने चालू सदोष शिक्षणपद्धतीचा अवलम्ब नाइलाजाने आपणाला करावा लागत आहे. यामुळे हल्ली प्रत्येक विद्यार्थ्यांचे ध्येय म्हणजे 'परीक्षा' झाले आहे. उठला

सुटला तो परीक्षेच्या पाठीमागे लागतो. परीक्षा पास झाली की सम्पले शिक्षण. प्रत्यक्ष ज्ञानकिरणाचा लाभ झाला नाही, आत्मिक विकास, बौद्धिक विकास अथवा शारीरिक विकास झाला नाही तरी चालेल. पण कसेही करून फक्त परीक्षा पास झाली म्हणजे झाले अशा तऱ्हेची हीन मनोवृत्ती सर्व विद्यार्थ्यांची झाली आहे. जास्तीत जास्त मार्क व कमीत कमी ज्ञान असा सुन्दर मेळ यात बसला आहे. या सर्व कारणामुळे सत्य, शील व प्रामाणिकपणा या गुणास पारखे झालेले कारकून, पोलीस इन्स्पेक्टर्स, तसेच हल्लीचे शिक्षक असल्या फरमाशीची अवलाद या शिक्षणामुळे उत्पन्न होत आहे. स्वतःचे ह्मणून काही वैशिष्ट्य आहे अशी हिन्दी लोकाना जाणीवच राहिली नाही. ते शरीराबरोबर मनानेहि परक्याचे गुलाम होऊन राहिले आहेत. ही परिस्थिति पालटणे थोडेफार शिक्षकाचे हाती आहे. त्यानी मनात आणले तर या बाबतीत त्याना थोडफार प्रयत्न करता येतील. तेवढ्याचकरता त्यानी आपली स्वतःची वर्तणूक पूर्णपणे सुधारली पाहिजे.

मुलांच्या शीलावर शिक्षकाच्या अचरणाचा नकळत परिणाम होत असतो एवढ्याकरता प्रत्येक शिक्षकाची अन्तर्बाह्य वर्तणूक अत्यन्त शुद्ध, साधी आणि निर्मळ पाहिजे. शिक्षक व्यसनी व कुमार्गी असला तर विद्यार्थ्यावर वाईट परिणाम होण्याचा बराचसा सम्भव असतो. कारण मुले ही निसर्गतःच अनुकरणप्रिय असतात. मोठ्यांचे अनुकरण करावे असे त्याना स्वभावतःच वाटते. अर्थात् ज्यांचा त्यांचे बरोबर जास्त सहवास होईल, त्यांच्या वागणुकीचा व नीतिमत्तेचा परिणाम त्यांचे मनावर होत असेल यात नवल नाही ह्मणून शिक्षकाने आपले अचरण निर्दोष ठेविले पाहिजे. शिक्षकाचे ठिकाणी जर स्वदेशाभिमान, स्वार्थत्याग, ब्रह्मचर्य हे गुण उत्कटतेने वास करीत असतील, तर त्याचा सुपरिणाम मुलावर झाल्यावाचून राहणार नाही. महात्मा

गान्धीच्या निर्मल आचरणाचा सर्व राष्ट्रांवर कसा अभूतपूर्वक परिणाम झाला आहे हे सूज्ञ वाचकाना साङ्गावयास नकोच. मुलाना खरे बोलावयास साङ्गणारा शिक्षक स्वत: खरे बोलत असतो का ? याला उत्तर मोठ्या कष्टाने नाही असेच द्यावे लागते. ह्मणून प्रत्येक शिक्षक हा शीलवान, कर्तव्यदक्ष, प्रेमळ, सहनशील, अभ्यासू, नम्र, स्वदेशाभिमानी व तेजस्वी असला पाहिजे. त्याच्या वर्तनात, बोलण्यात व विचारात विसङ्गतपणा कधीहि असता उपयोगी नाही. एवंच शिक्षकाने आपले स्वतःचे वर्तन सुधारल्यास या चालू सदोष शिक्षण पद्धतीमधूनही आपणास योग्य असे शिक्षण थोडे फार देता येईल.

## लहान मुले व शिक्षण-स्वातन्त्र्य.

" One single problem presents itself as the basis of all education : How are we to give the child freedom ? "

- Dr. **Maria Montessori**.

आजकाल लहान मुलाना देण्यात येणाऱ्या शिक्षणात गुलाम-गिरीला अनुरूप असे मृतप्राय शिक्षण देण्यात येत आहे, त्यामध्ये सजीवपणा नाही. भविष्यकालात मुलाचा आत्मिक विकास कसा होईल इकडे साम्प्रतच्या शिक्षणक्रमात मुळीच लक्ष दिले जात नाही. लहान मुलाना पुढील आयुष्यात स्वतःच्या खऱ्या उच्चतम आकाङ्क्षा पुऱ्या करता येण्याजोगे हल्लीचे शिक्षण राष्ट्रीय व तेजस्वी खास नाही. परन्तु नुकतेच कुठे कुठे नवीन शिक्षणपद्धति प्रयोगादाखल सुरू झालेल्या दिसून येतात. Old order changeth yeilding place to new या टेनिसन् कवीच्या सार्थ उक्तीप्रमाणे हल्लीच्या शिक्षणात परिस्थितिनुरूप बदल अवश्य केला पाहिजे. आपल्या राष्ट्राचे भावी आधारस्तम्भ उत्कृष्ट निपजावे, अशी सदिच्छा असेल तर लहान मुलाना ताबडतोब शैक्षणिक स्वातन्त्र्य दिले पाहिजे,

यावाचून गत्यन्तर नाही. लहान मुलामध्ये त्यांच्या नैसर्गीक गुणाची वाढ योग्य रीतीने झाली पाहिजे. त्यांच्या जन्मजात आवडीची ओळख अगोदर शिक्षकाला झाली पाहिजे. लहान मुलाकरता नवीन शिक्षणपद्धति काढणाऱ्या डॉ० मॉन्टेसरी या बाई, शिक्षकाला शिक्षक समजत नसून, त्याला लहान मुलांचा एक चाङ्गला सद्‌गुणी व सद्वर्तनी पुढारी अथवा नेताच समजतात. अडचणींच्या प्रसङ्गी शिक्षकाने लहान मुलाना थोडी मदत करावयाची व इतर वेळी त्याना आपापल्या गुणाचा विकास होऊ देण्यास मोकळीक द्यावयाची या पद्धतीचा या विद्वान बाईनी अङ्गिकार केला आहे.

लहान मुलाना शिक्षणाचे बाबतीत पूर्ण व निर्भेळ स्वातन्त्र्य असले पाहिजे; स्वतःच्या कलाप्रमाणे आवडीप्रमाणे वर्तन करण्याची व अभ्यास करण्याची त्याना पूर्ण मुभा असली पाहिजे अशा स्वतन्त्र वातावरणात जर मुलांची वाढ झाली तर ती पुढे अत्यन्त सुशील, विद्वान् व शूर निघतात असा शिक्षणतज्ज्ञांचा अनुभव आहे. मुलाना लहानपणी ‘ तुह्मी कधींही खोटे बोलू नका—चोरी करू नका ’ अशा तऱ्हेचा आज्ञावजा उपदेश कधीही करू नये. कारण याचा परिणाम बहुशी उलटाच होत असतो. त्याना त्यांच्या कलाप्रमाणे वागू दिले तर ती मुले खरे बोलण्यास आपोआप शिकतात. ती मुले अन्तः-स्फूर्तीनेच चाङ्गल्या मार्गाकडे वळतात. शिक्षकाने अथवा पालकाने लहान मुलाना स्वतःच्या ज्ञानाच्या घमेण्डीत ( अज्ञानाच्या म्हणा हवे तर ! ) उपदेश न केला तर कृपाळू ईश्वर आपल्या लेकराना वाईट मार्गाला खाचित नेणार नाही.

हल्लीचे काळी जे शिक्षण देण्यात येत आहे त्यापासून उत्तम पुढारी, नेते अगर विद्वान माणसे हाताच्या बोटावर मोजण्याइतकीच का होतात ? कारण चालू शिक्षणात विद्यार्थ्यांची वाढ बाह्योपचाराने करण्याचा प्रयत्न केलेला असतो. मुलांचा आत्मिक विकास होण्यास

योग्य असे शिक्षण मुळीच मिळत नाही. हा विकास नुसत्या व्याख्यानाने, अगर साम्प्रत देण्यात येणाऱ्या शिक्षणाने मुळीच होणार नाही. हा आत्मिक विकास होण्यास लहान मुलाना शिक्षणाचे बाबतीत पूर्ण स्वातन्त्र्य दिले पाहिजे व त्याच्या आवडीप्रमाणे निरनिराळ्या विषयांची माहिती करून घेण्याकरता तशी मुबलक साधनसामुग्री तयार केली पाहिजे.

बालपणी मुलांच्या व्यक्तित्वाला (Individuality) जितका जास्त वाव द्यावा तितकी मुले पुढे जास्त चाङ्गली निपजतात. एवढ्याकरता शिक्षकाने त्यांच्या आयुष्यात विनाकारण ढवळाढवळ करू नये. शिक्षक हा किती जरी विद्वान् बी. ए., बी. टी., टी. डी. असला तरी त्याच्या अविरत प्रयत्नाने व विद्वत्तेने तयार झालेल्या मुलात त्या मुलाचे स्वत:चे व्यक्तित्व प्रगट होत नसून त्या शिक्षकाचे व्यक्तित्व व आवडीनिवडी प्रतीत होतात. अशा रीतीने शिक्षकाने जबरदस्तीने व कित्येक वेळेला छड्यांचे साह्याने दिलेल्या ज्ञानाने फायद्यापेक्षा त्या मुलाचे नुकसानच फार होते. वाईट मुले बहुंशी अशाच शिक्षणाने तयार झालेली असतात. लहान मुलाना व्यक्तित्वाची वाढ होण्यास स्वातन्त्र्य देऊन फक्त आपल्या अधिकारात त्याना प्रसङ्ग पडल्यास वाईट मार्गापासून चाङ्गल्या मार्गाला आणावयाचे एवढेच खऱ्या शिक्षकाचे कर्तव्यकर्म आहे. अमूक एक गोष्ट वाईट असे शिक्षक साङ्गतो ह्मणून आपण ती करू नये अशी अन्धश्रद्धात्मक विचारसरणी मुलांची करू नये. सभोवतालच्या परिस्थितीनुरूप अमूक गोष्ट चाङ्गली व अमूक गोष्ट वाईट हे त्याचे त्यासच समजले पाहिजे. शिक्षकाने मुलाच्या मार्गातील सर्व अडचणी दूर करावयाच्या नसून मुलाने स्वत:च त्या अडचणींस धीराने तोण्ड देऊन आपला योग्य मार्ग हुडकून काढला पाहिजे. पण या गोष्टी मुलाना शिक्षणस्वातन्त्र्य दिल्याखेरीज होत नाहीत. एवढ्याकरता

शिक्षकाकडे जबरदस्तीने शिस्त लावण्याचे जे पूर्वापार अधिकार दिले गेले आहेत त्यात क्रान्ती करून विद्यार्थ्यांवर फक्त नीट देखरेख करण्याचे काम त्याना देण्यात यावे.

मुलाना स्वातन्त्र्य दिले तर ती मुले पुढे दुर्वर्तनी, दुष्ट, व समाजास विघात करणारी अशी होतील ही काही लोकांची विचार-सरणी अत्यन्त चुकीची आहे, हे हल्ली सप्रमाण सिद्ध झाले आहे. मुले एकत्र बावरीत असता आपण प्रत्येक जण समाजाचे एकेक घटक आहोत ही जाणीव लहानपणापासून त्यांचे मनात उत्पन्न होते. आपण आपल्या मालकीच्या वनात असून वाटेल तसे वागण्याची आपणास मुभा आहे अथवा सभोवतालच्या व्यक्तींची दिक्कत न बाळगता आपणास बेफाम तऱ्हेचे वर्तन करण्यास काही हरकत नाही, या कल्पनेला पूर्ण आळा पडतो. जगात आपण एकटेच नसून दुसरे लोक आहेत, ही भावना त्यांचे मनात जागृत होते. या जगात नुसता स्वार्थ नसून इतरांचे कल्याणाकरता आपण काही तरी कर्तव्यकर्म करणे अत्यन्त अवश्यक आहे ही जाणीव या बाल-कांचे हृदयात उद्भूत होते. आपण मनमानेल तसे वागण्यास स्वतन्त्र नसून समाजाचे घटक आहोत, ही भावना एकदा का उत्पन्न झाली की, त्याची प्रत्येक कृती दुसऱ्याला उपकारक होत जाते व अशा रीतीने जबरदस्तीच्या शिक्षणाशिवाय सभोवतालच्या मोकळ्या वातावरणाने व परिस्थितीने तो उत्तम नागरीक होतो.

सुप्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ ए. एस्. नीलसाहेब म्हणतात 'कडकडीत आज्ञा व नीतिविषयक व्याख्याने यांचा परिणाम दडपशाहीत होतो. नैतिक शिक्षण मुलाना बिलकूल देऊ नये. निसर्गतः शुभ्र पुष्पासारखी सात्विक व निर्मळ असणारी मुले या नैतिक शिक्षणापासून बिघडा-वयास लागतात असाच आजपर्यन्तचा अनुभव आहे. शिक्षणाने मुलांची मने कमकुवत व भित्री बनतात; असली मुले भाविष्यत्काली

निस्तेज व सर्वस्वी परावलम्बी होतील यात नवल काय ?'

लहान मुलांचा आत्मिक विकास होणारे शिक्षण त्याना अगोदर मिळाले पाहिजे. हा आत्मिक विकास झाला तर मुले पुढे चाङ्गली व सद्गुणी निपजतात. कडकडीत शिस्त व बहुविध माहिती हीं शिक्षणातील प्रमुख अङ्गे न होता स्वातन्त्र्य व आत्मिक विकास हीच नवीन शिक्षणपद्धतीची प्रमुख अङ्गे झाली पाहिजेत. जबरदस्तीने अनेक विषयांचे शिक्षण मुलांचे डोक्यात कोंबण्याचे अजिबात सोडून दिले पाहिजे. शिक्षकाने फक्त मुलामध्ये निरनिराळया विषयांची आवड उत्पन्न करावयाची. ज्या विषयाची आवड मुलामध्ये विशेष उत्पन्न होईल त्या विषयाचा अभ्यास करण्यास त्या मुलास भरपूर साधन-सामुग्री पुरविणे हे शिक्षकाचे व शिक्षणखात्याचे कर्तव्य आहे. अशा रीतीने मुलामध्ये निरनिराळया विषयांची आवड उत्पन्न करून, त्याना आवडणाऱ्या विषयाचा अभ्यास सुरू ठेवण्यात प्रोत्साहन देणे व अडचणीच्या ठिकाणी फक्त वाटाड्याचे काम करणे हेच शिक्षकाचे प्रमुख कर्तव्यकर्म आहे.

मि. नॉर्मन् मॅकूमन् यानी वर विवेचन केलेल्या तीन तत्त्वावर — स्वातन्त्र्य, स्वावलम्बनद्वारे आत्मिक विकास व मुलांची जन्मजात एखाद्या विषयाची आवड यावर — टिप्ट्री हॉलमध्ये एक सुन्दर व नमुनेदार संस्था चालविली आहे. तिथे आबालवृद्ध एकाच दर्जावर असून ज्ञानार्जनाकरिता सगळेच सारखे झटत असतात. लहान मुलाना मन मानेल तसे वागण्यास पूर्ण मोकळीक दिली आहे. पाहिजे तर त्यानी स्वस्थ बसावे. अर्थात् सभोवतालची इतर मुले निरनिराळया नवीन नवीन कृती करण्यात, वाचनात, अभ्यासात गुन्तली असताना कोणत्याहि मुलाला जास्त वेळ स्वस्थ व निरुद्योगीपणाने बसवतच नाही. मॉन्टेसरीबाईंना हीच पद्धत पसन्त आहे. तिच्या शाळेतही मुलाना पूर्ण स्वातन्त्र्य असते. जर मुलाला काम करावेसे न वाटून

खिडकीबाहेर शून्य वृत्तीने पहावेसे वाटले, आकाशाकडे टक लावून विचार करावासा वाटला, झोपाळ्यावर बसून गात गात झोके घ्यावेसे वाटले, अगर मृदू हिरवळीवर स्वस्थ पडावेसे वाटले तरी सर्व काही करण्यास त्याना मोकळीक ठेविली आहे. शेवटी थोड्या फार वेळात जबरदस्तीशिवाय मुले अभ्यास करू लागतात व अशा तऱ्हेने शिक्षणाचा उद्देश सफळ होतो, असा डॉ. मॉन्टेसरी या बाईचा अनुभव आहे.

लहान मुलामध्ये एक प्रकारचा जिवन्तपणा व जिज्ञासा असते. अमुक गोष्ट कशी झाली ? ती तशी का झाली ? अशीच का झाली नाही ? अशा रीतीचे अनेक प्रश्न त्यांच्या डोकीत थैमान घालीत असतात. असे प्रश्न जर मुलाने विचारले, तर त्याच्या जिज्ञासेवर व उत्सुकतेवर शिक्षकाने केव्हाही विरजण घालू नये. कोणत्याही वेळेस मुलाने विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देऊन त्याची जिज्ञासा पूर्ण करून त्याचे ज्ञान वाढविणे हेच शिक्षकाचे कर्तव्य आहे. पण साम्प्रतचे शिक्षक तसे मुळीच करीत नाहीत. उदाहरणार्थ - गणिताचा तास सुरू आहे, शिक्षक लहान मुलाना समजाऊन देण्याचा प्रयत्न करीत आहे. अशा वेळेस जर एखाद्या मुलाने मध्येच उठून “ मास्तर ! आमच्या मांजरीला आज ४ पिले झाली. किती नाजूक आहेत म्हणून साङ्गू ! ” असे साङ्गितले तर त्या वेळेस त्या मुलाला विनाकारण मारून अगर रागे भरून त्याचा उत्साहभङ्ग करू नये. ही शिक्षकाला खरोखरच चाङ्गली सन्धी प्राप्त झालेली असते, ती त्याने आपल्या मूर्खपणाने वाया घालवून देऊ नये. या अनपेक्षित प्रश्नाने सर्व वर्गातील मुलांच्या बुद्धीला कलाटणी मिळून ती विशेष जिज्ञासू व तीव्र झालेली असते. या सुसन्धीचा फायदा घेऊन शिक्षकाने मुलाना मांजरीची व पिलांची माहिती साङ्गून उलट मुलानाच ‘ एका मांजरीला सहा महिन्यात ४ पिले होतात, तर पाच वर्षांत किती पिले होतील ? ’

असे विचारून त्यांचेकडून उत्तर काढावे व अशा तऱ्हेने हसत हसत विचारून त्याना विशेष फायदा होईल, ज्ञान मिळेल असे करावे. शिक्षक शिकवीत असलेल्या मूळ विषयास सोडून जरी कोणताही दुसरा विषय मुलाने उत्सुकतेने विचारला तर त्याला रागे न भरता शिक्षकाने तो विषय समजावून साङ्गून त्याची व इतर सर्व मुलांची जिज्ञासा पूर्ण करून बुद्धी जागृत व कुशाग्र करावी. परन्तु हल्लीच्या शिक्षकबुवाना असले चाळे मुळीच खपत नाहीत! हल्लीचे ठरावीक साच्यातील शिक्षण हे रवीन्द्रनाथ टागोर यानी 'गोरा' कादम्बरीत लिहिल्याप्रमाणे 'लहान मुलास भूक नसताना जबरदस्तीने खाण्यास घालण्यासारखे आहे.' भूक नसताना खाल्लेल्या अन्नाचा परिणाम चाङ्गला होत नाही तसेच मुलांचे लक्ष नसताना व त्याना आवडत नसताना कोणताही विषय त्यांचे मेन्दूत भरवून देणे ह्मणजे त्यांच्यावर जुलूम करण्यासारखेच आहे व पर्यायाने त्यांच्या बुद्धीची वाढ खुण्टविण्यासारखे आहे.

शिक्षणाने लहान मुलांच्या बुद्धीला चालना मिळाली पाहिजे. त्यांच्यात निःस्वार्थबुद्धी व ऐक्यबुद्धी यांची वाढ झाली पाहिजे. त्यांची जिज्ञासा वाढली पाहिजे. त्यानी स्वतःच शिस्त लावून घेतली पाहिजे. मुले स्वावलम्बी झाली पाहिजेत. त्यांचा आत्मिक विकास अगोदर झाला पाहिजे. हे सर्व होण्यास मुलाना शिक्षणाचे बाबतीत स्वातन्त्र्य मिळाले पाहिजे, त्याखेरीज गत्यन्तर नाही.

'Give me the young' या नामाङ्कित पुस्तकाचे कर्ते मि. एड्मण्ड् होम्स् हे आपल्या पुस्तकातही हेच प्रामुख्याने प्रतिपादन करतात. ते ह्मणतात की – 'मला तरुण मुले पाहिजेत; पण कशाला? त्यांचेवर जुलूम-जबरदस्ती करून त्याना त्रास द्यायला? नव्हे. त्यांचे हृदयातील दैवी व सात्त्विक विचाराना व भावनाना चालना देऊन त्यांचा उद्धार करविण्याकरताच मला तरुण मुले पाहिजेत.'

हल्लीची तरुण मुले हीच पुढे जगात सुधारणा घडवून आणणारी आहेत. त्याना भविष्यत् काली आपले स्वतन्त्र विचार निर्भीडपणे माण्डण्यास यावेत व त्यांचा उपयोग जगाची चाङ्गल्या मार्गाने उत्क्रान्ती करण्याकडे व्हावा, एवढ्याकरता त्याना शैक्षणिक स्वातन्त्र्याची अत्यन्त जरुरी आहे.

## लंडनमधील बालक-मंदिरे

"The business of education, is not to make the young perfect in any one of the sciences, but so to open and dispose their minds as may best make them capable of any, when they shall apply themselves to it."

**Locke.**

आज इङ्ग्लण्डमध्ये मुलाना जितके महत्त्व दिले जात आहे तितके जगाच्या इतिहासात आजपर्यन्त कोणत्याही देशात दिले गेले नव्हते. परवांच्या यूरोपातील महायुद्धात असङ्ख्य वीरांची प्राणाहुती दिली गेल्याने इङ्ग्लण्डचे भावी वैभव साम्प्रतच्या लहान मुलावर सर्वस्वी अवलम्बून राहिले आहे. या लहान मुलाना अत्युत्कृष्ट शिक्षण मिळून ते चाङ्गले नागरीक कसे होतील एवढ्याकरता इङ्ग्लण्डमध्ये दररोज नवे नवे प्रयत्न सुरू आहेत. कारण The race marches forward on the feet of little children असे म्हणतात ते पूर्ण खरे आहे.

इङ्ग्लण्डमधील हल्लीच्या शिक्षणतज्ज्ञावर व शिक्षणाधिकाऱ्यावर एक मोठी जबाबदारी येऊन पडली आहे व या लहान बालकांचे शिक्षण योग्य रीतीने कसे होईल याबद्दल त्याना अत्यन्त काळजी लागून राहिली आहे. आजपर्यन्त ज्या जुन्या पद्धतीने मुलाना शिक्षण देण्यात येत होते ते समाधानकारक आहे असाच लोकांचा

आतापर्यन्त समज होता. परन्तु आहे ही शिक्षणपद्धति लहान मुलांचा बुद्धिविकास व आत्माविकास करण्यास अयोग्य अतएव टाकाऊ असल्याबद्दल ज्यावेळी टीकेचे मोठे वादळ उठले तेव्हां शिक्षणक्रम आखणाऱ्या समितीचे डोळे उघडले. पूर्वीची शिक्षणपद्धति ही चालू शिक्षणपद्धतीपुढे जुनी, मध्ययुगीन असल्यासारखी भासते. जुन्या पद्धतीने मुलांचा आत्मिकविकास थाम्बून त्यांची विचारशक्ति बोथट होते याची लोकाना जाणीव झाली. एवढेच नव्हे तर कित्येक वेळेला लाजाळू किंवा कलाप्रवृत्ती असणाऱ्या मुलांचा या जुन्या शिक्षणपद्धतीने व्यावहारिक आणि इतर दृष्टीने न भरून निघणारा तोटा झालेला दिसून आला आहे व एवढ्याकरता नवीन शिक्षणक्रम आखण्याची जरूरी शिक्षण तज्ज्ञाना भासली.

लहान मुलाना त्यांच्या विशिष्ट आवडीनिवडीप्रमाणे व स्वाभाविक कलाप्रमाणे शिक्षण घेण्याची व वागण्याची पूर्ण मुभा देऊन त्यांचा शारीरिक, मानसिक व आत्मिक विकास करणारे शिक्षण असावे असे सर्वांस वाटू लागले. लगेच त्या तऱ्हेची शिक्षणपद्धति आखली गेली. जर एखाद्या लहान मुलाची प्रवृत्ति बालपणापासून शिल्प अथवा चित्रकला इकडे असेल तर त्याला त्याच्या आवडीच्या विषयात प्राविण्य मिळविण्याकरता त्या तऱ्हेचे योग्य वातावरण त्याच्या भोवती उत्पन्न करणे हे एक चालू शिक्षणक्रमातील प्रमुख अङ्ग आहे. अशा रीतीने योग्य उत्तेजन दिले गेलेल्या मुलाचा सर्वाङ्गीण विकास योग्य मार्गाने होत जाईल, यात सन्देह नाही.

परन्तु हे सर्व होणार कसे? असा प्रश्न विचारण्यास बरेच वाचक मोठे उत्सुक असतील! अशा तऱ्हेचे शिक्षण देणाऱ्या अनेक संस्था इङ्ग्लण्डभर स्थापन झाल्या असून त्यांचे बहुतेक प्रयत्न यशस्वी झाले आहेत. खुद्द लण्डनशहरी अशा काही संस्था स्थापन झाल्या असून त्याना Utopain School for London

Children अथवा नवोदित कल्पनेप्रमाणे लहान मुलाना शिक्षण देणाऱ्या शाळा असेही म्हणतात. मुलांचा आत्मिक विकास होण्यास योग्य असे शिक्षण देण्याचा यशस्वी प्रयत्न या शाळातून केला जातो.

या बालक–मन्दिरातून बालकाना मनाला वाटेल त्याप्रमाणे वागण्याची मोकळीक देण्यात येते. तिथे ठराविक अभ्यासक्रम आखलेले नाहीत. मुले आपापल्या इच्छेप्रमाणे स्वतःची करमणूक करून घेतात. एका शाळेत एकदा एक तीन वर्षांचा मुलगा सबन्ध आठवडाभर सारखा निरनिराळी निशाणे काढून रङ्गवीत होता तर दुसरा एक मुलगा काही दिवस एक कुत्राच काढीत होता. या त्यांच्या स्वतन्त्रतेला कोणत्याही कारणानी केव्हाही अडथळा उत्पन्न करीत नाहीत. शाळेत मुलांचे कानावर वाईट शब्द अथवा शिवी-गाळ न पडेल अशी व्यवस्था केलेली असते. त्याना मिळणारे शिक्षण हे प्राय: तर्कशुद्ध–बुद्धिवाद, प्रत्यक्ष आकृति, मोजमाप, ध्वनी व सूक्ष्म निरीक्षण यांच्याच साहाय्याने दिले जाते. या ठिका-णची मुले अगदी लहान वयातच कपडे घालण्या–काढण्यास, स्वतःचे बिछाने टाकण्यास, जेवताना स्वतःची पाने वाढून घेण्यास शिकतात. खेळ खेळणे, बागेतून उड्या मारीत स्वच्छन्दाने धावणे, गाणे हे तर त्यांचे अगदी आवडीचे विषय. इतके शिक्षण सहजा-सहजी मिळत असतानाच ही लहान बालके प्रामाणिक, निस्वार्थी सहृदय व निष्कपटी बनतात.

या शाळेच्या इमारती सुन्दर असून सभोवती विस्तृत आणि मनोरम उपवने आहेत. मुलांच्या शिक्षणास अवश्यक असे साहित्य विपुल असून शिक्षक-वर्गही उत्कृष्ट असतो. या शाळेत शिक्षणाने मुलामध्ये होणारी सुधारणा पाहून हा एक अद्भुत चमत्कार वाटतो. शाळेत मुलानी प्रवेश केल्यापासून अवघ्या तीन चार महिन्यात

ती आमूलाग्र बदलून त्यांचे शील, प्रकृती व स्वभाव हे उत्कृष्ट होतात. मुले शाळेत प्रथम ज्या वेळेस येतात तेव्हां इङ्ग्लण्डातील सर्वसाधारण मुलाप्रमाणे ती उनाड, हट्टी व फटकळ अशी असतात; परन्तु शाळेत आल्यावर थोड्याच दिवसात सुधारून ती अत्यन्त प्रेमळ आणि विनयशील होतात. अर्थात् त्याना पहिल्या प्रथम सुधारण्यास व योग्य वळण लावण्यास बराच त्रासही पडतो.

शाळेतील वातावरण मोठे गम्भीर आणि शान्ततेचे असते. शिक्षक मुलाना अत्यन्त हलक्या आवाजात शिकवितात. मोठ्याने ओरडून कोणीही शिकवीत नाही. लहान मुलाना शिक्षक कधीही हिणवीत नाही व मूर्ख, मद्दड, गाढव असेही ह्मणत नाही. शिक्षकाच्या विषयी मुलाना फार आदर असतो व त्याचबरोबर त्यांचे ऐकावयाचे ही सद्बुद्धीही त्यांचे ठिकाणी तीव्र जागृत असते. शाळेत आपापल्या आवडत्या बिछान्यावर बसून, तोण्डाने गाणी गुणगुणत मुले नेहमी अक्षरयुक्त खेळणी, चौकोनी विटासारख्या लहान तुकड्यांच्या पेट्या, गोल रङ्गीबेरङ्गी मणी, चौकटी वगैरे खेळणी घेऊन खेळण्यात मग्न झालेली नेहमी कुणालाही दिसून येतात. शिक्षक प्रत्येक विद्यार्थ्याजवळ जाऊन त्याच्या बरोबर खेळत खेळत त्याला अक्षरांची ओळख करून देतो. तसेच त्या रङ्गीबेरङ्गी मण्यांच्या साहाय्याने तो त्याना आकड्यांचेही ज्ञान करून देतो. सर्वांत आश्चर्याची गोष्ट अशी की, अशा पद्धतीने शिकलेले धडे मुले कधीही विसरीत नाहीत. त्यांच्या कोवळ्या बुद्धीला आकलन होणार नाही अशी अथवा मेन्दूला त्रास होईल अशी कोणतीही गोष्ट त्याना साङ्गण्यात येत नाही. अवघड विषय कधी पाठ करावयास लावीत नाहीत. त्यांच्या बुद्धीचा विकास अडथळ्या-शिवाय सहज होत जाईल असेच शिक्षण देण्यात येते. मॉन्टिसूरी व फ्रोबेल या दोन शिक्षण-पद्धतीतील उत्तम तेवढे घेऊन ही

मिश्रपद्धति तयार करण्यात आली आहे.

मुलांची भोजनाची व्यवस्था शाळेतच केली असते. जेवावे कसे, टेबल माण्डावे कसे, टेबलावर पदार्थ कसे ठेवावेत, दुसऱ्या मुलाना कसे वाढावे या सर्वांचा अन्तर्भाव शिक्षणातच केला जातो. तीन तीन चार चार वर्षांची लहान बालके परन्तु त्यांच्या ठिकाणी पोक्त मनुष्याप्रमाणे कृती करण्याइतकी त्यांच्या बुद्धीची वाढ लहानपणीच होते. सदरहू शाळा स्थापन करण्याचे मुख्य श्रेय मिस् बेली रेनी व मिसेस् स्ट्रौड या दोन इङ्ग्रजी बायानाच आहे. सदहू शाळानाच जोडून एक स्वतन्त्र ट्रेनिङ्ग कॉलेज स्थापन केले आहे. त्या ठिकाणी लहान मुलाना नूतन पद्धतीने कसे शिक्षण द्यावे याबद्दल शिक्षण देण्यात येते. अर्थात् लहान मुलांची शारीरिक, मानसिक व आत्मिक उन्नति होण्यास योग्य मार्गदर्शक असे उत्कृष्ट शिक्षक तयार करणे हा या कॉलेजचा एक उद्देश आहे व बऱ्याच अंशाने तो सिद्धीसही जात आहे.

अशा रीतीचे उत्कृष्ट शिक्षण ज्या देशात दिले जाते, त्या देशातील मुलांचे भाग्य कुणीकडे व मृतप्राय शिक्षण मिळणाऱ्या आमच्या मुलांचे भाग्य कुणीकडे ? याला कारण काय ? फक्त एकच आणि ते ह्मणजे आह्मी स्वतन्त्र नाही.

आमचा शिक्षणक्रम ठरविण्यास आम्हाला अधिकार नाही. आमचा शिक्षणक्रम पाश्चात्य गोऱ्यानी ठरवावा, त्यापद्धतीने आह्मी शिकावे व मुलाना शिकवावे व शिकून फक्त कारकुनी करावी. दुर्दैव आमच्या देशाचे दुसरे काय! आह्माला हल्ली कोणत्या तऱ्हेचे निरुपयोगी शिक्षण मिळत आहे याची साधारण कल्पना पुढील गोष्टीवरून सहज येईल —

" एकदा एक विख्यात कादम्बरीकार एका विद्याखात्यांतील दिपोटीबरोबर एका शाळेत सहज गेला. सर्व मुले अगदी कळाहीन

दिसत होती. दिपोटीने वर्गात मुलाना बरेच प्रश्न विचारले. 'सैबेरियात मुख्य नद्या कोणत्या?' प्रश्न विचारताच एका मुलाने बरोबर उत्तर दिले. 'आल्प्स् पर्वताची उंची काय?' उत्तर बरोबर मिळाले. इङ्ग्लण्डच्या पार्लमेण्टमध्ये किती सभासद असतात? उत्तर बिनचूक आले. 'मिल्टनचे कोणते काव्य प्रसिद्ध आहे?' साऱ्यांच्या मुखांतून बरोबर एकच उत्तर! दिपोटीने विचारलेल्या एका इङ्ग्रजी कवितेवरील प्रश्नासही वर्गाकडून बरोबर उत्तरे मिळाली. दिपोटी खूष झाले. शिक्षकाचा चेहराही प्रफुल्लीत झाला. वर्गातून 'सुटलो एकदाचे!' अशा अर्थाचे खोल निश्वास बाहेर पडले. इतक्यांत त्या कादम्बरीकाराला काही प्रश्न विचारण्याची दुर्बुद्धी झाली. त्याने सहज विचारले 'तुमच्या गावचे मुख्य पीक कोणते?' मुले चुळबुळ करू लागली. त्यांना उत्तर सुचेना. 'तुमच्या गावचा वसूल किती आहे?' विद्यार्थी शिक्षकाच्या तोण्डाकडे टकमक पाहू लागले. शाळेतल्या बागेतील फूल त्या कादम्बरीकाराने हातातून आणले होते ते पुढे करून विचारले, 'या फुलाचे नाव काय?' एकाने 'आह्मास ठाऊक नाही' म्हणून चाचरत उत्तर दिले. 'नेताजी पालकर मुसलमान का झाला?' वर्गात एकदम विजेप्रमाणे आश्चर्याची लाट पसरली. शेवटी त्याने एक सुन्दर मराठी कविता ह्मणून दाखविली व त्यावर एक दोन प्रश्न विचारले. त्यावेळी 'आमची ही कविता झाली नाही' ह्मणून वर्गाच्या कोपऱ्यातून ध्वनी उठला. हे दृश्य पाहून त्याला कीव आली. दिपोटी ओशाळले व शिक्षकाने खाली मान घातली.

## स्वीडनमधील शिक्षणपद्धति

स्वीडनमधील शिक्षणपद्धति ही 'सूक्ष्म निरीक्षण व स्वतन्त्र कल्पना यांची वाढ करून त्यांचा प्रत्यक्ष व्यवहारात उपयोग करून घेणे' या तत्त्वावर मुख्यतः उभारली आहे.

आपल्या देशांत शिक्षण-प्रसार होण्याकरिता स्वीडिश सरकाराप्रमाणेच देशातील सर्व सुज्ञ लोक कायावाचामनेकरून झटत असतात आणि त्यामुळे लोकसङ्ख्येच्या मानाने स्वीडनमध्ये विश्वविद्यालये व विद्यालये फार आहेत. शास्त्रीय शिक्षणाकडे सर्वांचे जास्त लक्ष वेधले जात असून स्वीडिश तरुणही शास्त्रीय शिक्षण घेण्यास गर्दी करीत असतात. सुधारणा आणि शास्त्रीय ज्ञान या बाबतीत स्वीडन या देशाची गणना जगातील प्रमुख पुढारलेल्या राष्ट्रात करण्यास हरकत नाही.

इ० सनाच्या १७ व्या शतकाच्या पूर्वार्धातच स्वीडन मधील पाद्री लोकांच्या प्रयत्नाने अशिक्षित लोकातही शिक्षणाचा बराच फैलाव होऊ लागला होता. पुढे इ. सन १८८६ मध्ये सरकारने एक शिक्षणविषयक कायदा पास करून सर्व लोकामध्ये शिक्षणाचा पूर्ण प्रसार करण्याचे काम हाती घेतले. अशा रीतीने त्या वेळी शिक्षण हा विषय धार्मिक संस्थेच्या हातून सरकारच्या हाती पहिल्यानेच गेला. आठराव्या शतकात कांही विशेष सुधारणा घडून न येता शिक्षणाचा फैलाव बेताबातानेच होत होता. इ. सन १८४२ मध्ये स्वीडिश सरकारने असा एक कायदा पास केला की, त्याच्या योगाने प्रत्येक खेड्यात मुलाकरता निदान एक तरी शाळा असणे अत्यावश्यक असून तीवर नेमला जाणारा शिक्षक हा लायख असल्याबद्दलचा दाखला असल्यानन्तरच तो नेमला जात असे. या कायद्याप्रमाणे हल्ली प्रत्येक जिल्हानिहाय जरूरीप्रमाणे एक अथवा अनेक विद्यालये स्थापन केली आहेत. खेडेगावातील प्राथमिक शिक्षण सम्पल्यानन्तर पुढील कोणत्याहि सङ्कल्पित विषयाचे शिक्षण घेण्याकरता मुले या विद्यालयात येऊन दाखल होतात. या विद्यालयातून मुलाना आवश्यक व योग्य असे उच्च शिक्षण देण्याची सरकारने व्यवस्था केली आहे. या सर्व विद्यालयावर सरकारने नेमलेल्या Public School

Board of Administration या संस्थेचा पूर्ण ताबा असून या संस्थेने नेमलेले इन्स्पेक्टर्स ही सर्व विद्यालये काळजीपूर्वक तपासीत असतात.

**विद्यार्थी** – प्रत्येक आईबापाने आपली मुले शाळेत पाठविलीच पाहिजेत अशी सक्ती आहे. या बाबतीत राष्ट्रातील प्रत्येक मूल शाळेत येते की नाही हे पाहण्याचे काम स्कूल बोर्डाकडे आहे. या शाळातून साधारणतः ७ ते १४ वर्षांपर्यन्तची मुले असतात. काही मुलांचे आईबाप मुलाचा शाळेचा शिक्षणखर्च व त्याच्या अन्नपाण्याचा व कपड्यालत्याचा खर्च पोसण्यास असमर्थ असतात. अशा वेळी हा सर्व खर्च ज्या त्या गावाने सोसला पाहिजे असा नियम आहे. वाईट व दुर्गुणी मुलाना शाळेतून काढून त्यांच्याकरिता स्वतन्त्र काढलेल्या शाळेत त्याना पाठवितात. नन्तर त्या ठिकाणी त्यांची सुधारणा होते. प्रत्येक शाळेत निदान ८ महिने वर्ग सुरू असले पाहिजेत असा कायदा आहे. प्रत्येक शाळानिहाय एकेक डॉक्टर असून तो शाळेतील प्रत्येक विद्यार्थ्यांच्या आरोग्याकडे लक्ष देतो. ज्या योगाने मुले व मुली सुदृढ होतील अशा तऱ्हेची तो शक्य ती मेहनत घेतो. विद्यार्थ्यांना खेळण्याकरितां मोठमोठ्या तालमी बान्धल्या आहेत. त्यामधून सर्व तऱ्हेच्या खेळाची साहित्ये भरपूर ठेविली आहेत. प्रत्येक मुलाचे दात स्वच्छ आहेत की नाहीत इकडे फार लक्ष दिले जाते. शाळेत विद्यार्थ्यांकरिता स्वतन्त्र स्नानगृहे असतात. शाळेच्या इमारतीतच स्वतन्त्र स्नानाच्या खोल्या केल्या असून त्या ठिकाणी मुलाना ऊन पाण्याने योग्य नोकराकडून काळजीपूर्वक स्नान घातले जाते. त्याचप्रमाणे मुलांचे कपडेही शाळेतच वाफेच्या सहाय्याने धुवून स्वच्छ केले जातात. गरीब मुलाना अन्न मिळण्याचीही शाळेत व्यवस्था केलेली असते. मोठमोठ्या शहरातील शाळातून सर्व मुलाना जेवण मिळते व

स्टॉकहोम शहरी तर मुलाना फराळास दिले जाते.

सुट्टीच्या दिवसात गरीब मुलांची शाळेतच राहण्याची सोय केलेली असते. कित्येक वेळी सुट्टीत या गरीब मुलाना व त्याजबरोबर शाळेतील नाजूक प्रकृतीच्या मुलाना बाहेरगावी सुट्टीचा उपभोग घेण्यास पाठविण्यात येते. प्रत्येक टोळीत त्यांच्यावर व्यवस्था व देखरेख ठेवण्याकरिता एक पुरुष अथवा स्त्रीशिक्षक असतो व आवश्यक असा नोकरवर्गही असतो. या मुलाना राहण्याकरिता निरनिराळ्या हवेशीर ठिकाणी शाळेच्या मालकीच्या इमारती असतात. तशी सोय नसल्यास एखाद्या रानात शेतकऱ्याचे घर अथवा समुद्रकिनाऱ्याला एखादा हवेशीर बङ्गला भाड्याने घेतात. त्याठिकाणी मुलाना पौष्टिक अन्नाबरोबरच अत्यन्त शुद्ध आणि मोकळी हवा मिळून समुद्र-स्नानही करावयास सापडते. अशा रीतीने सुट्टीचा उपयोग मुलांचा उत्साह द्विगुणीत करण्याकडे, त्यांच्या ठिकाणी शिस्त, नियमितपणा, वगैरे गुणांची वाढ होण्याकडे केला जातो.

सर्व लोकाना चाङ्गले शिक्षण मिळण्यास व त्यांच्या ज्ञानाची वाढ होण्यास शाळेतील ग्रन्थसङ्ग्रहालयाचा फार उपयोग होतो. कायद्याने या ग्रन्थसङ्ग्रहालयाची व्यवस्था स्कूल बोर्डाकडे गेली आहे. इ. स. १९१४ साली एकट्या स्टॉकहोम शहरी सोळा ग्रन्थसङ्ग्रहालये असून त्यामध्ये ४३००० पेक्षा जास्त पुस्तके होती. ज्या लोकानी स्वतन्त्र धन्दा करण्याकरिता अगर इतर काही कारणाने शाळा सोडली आहे अशाकरिता "लोकप्रिय शास्त्रीय व्याख्याने" व "सार्वजनिक ग्रन्थसङ्ग्रहालये" यांचा फार उपयोग होतो. गरीब व अडाणी शेतकरी व मजूर या लोकाना उपयोग व्हावा म्हणून सरकारने ही ग्रन्थसङ्ग्रहालये स्थापून या व्याख्यानमाला सुरू केल्या आहेत. या प्रौढ स्त्रीपुरुषाकरिता सरकारने स्वतन्त्र शाळा काढल्या आहेत. त्यातून समाजाला अत्यन्त उपयुक्त व फायदेशीर

असेच शिक्षण दिले जाते. शाळातून लोकांची नीतिमत्ता वाढविण्याकडे विशेष लक्ष दिले जाते. शिकविताना देशाच्या भौगोलिक परिस्थितीचा विचार केला जातो. मातृभूमीच्या प्राचीन इतिहासाबरोबरच प्रचलित राजकीय परिस्थितीची लोकाना माहिती दिली जाते. लोकाना भविष्यकाली आपल्या अङ्गीकृत कार्यात ज्या गोष्टीचा उपयोग होईल असे व्यावहारिक शिक्षण दिले जाते. अशा शाळा साठाच्या वर असून देशाच्या सर्व भागात पसरल्या आहेत. त्यात ठराविक अभ्यासक्रम मुळीच नसतो व परीक्षा तर नसतेच नसते. मग सर्टीफिकेट अगर डिग्री कुठून मिळणार ? ज्या विषयावर व्याख्याने होतात त्याच विषयावरील पुस्तके लोकाना त्यावेळी वाचावयास दिली जातात. स्त्रियाना स्वयपाक, बागाईत, शिवणकाम, शिशुसङ्गोपन, वैद्यशास्त्र वगैरेविषयी शिक्षण दिले जाते.

**लोकप्रिय शास्त्रीय व्याख्याने** — चालू युग हे यन्त्रयुग असल्याने जगातल्या शोधांची माहिती समाजातील सर्व लोकाना होण्याकरिता ही व्याख्याने दरसाल दिली जातात. त्या ठिकाणी तात्त्विक ( Theoretical ) माहिती बरोबरच प्रात्यक्षिक ( Practical ) माहिती दिली जाते. यामुळे लोकांच्या मनात त्याबद्दल तीव्र जिज्ञासा उत्पन्न होऊन बरेच लोक या विषयाचा घरी स्वतन्त्र अभ्यास करू लागतात. अशी व्याख्यानकेन्द्रे निरनिराळ्या शहरातून व खेड्यातून सर्व देशभर पसरली आहेत. सरकार या व्याख्यानाकरिता दरसाल १५००० पौण्डाचे वर मदत करीत असून दर वर्षी १२००० चे वर व्याख्याने होतात. ज्या ठिकाणी ही शास्त्रीय व्याख्याने दिली जातात, त्याच ठिकाणी मोठमोठी ग्रन्थसङ्ग्रहालयेही असावीत, अशाबद्दल तिकडे प्रयत्न सुरू आहेत व ते बरेच यशस्वी झाले आहेत. त्यामुळे लोकाना ऐकलेल्या शास्त्रीय व्याख्यानाची विशेष माहिती या ग्रन्थातून मिळविता येते. या निरनिराळ्या ग्रन्थसङ्ग्रहा-

लयाना सरकार दरसाल पुस्तके घेण्याकरिता पुष्कळ मदत करते. यामुळे वर्षानुवर्ष ही ग्रन्थसङ्ग्रहालयातील पुस्तके एक सारखी वाढत आहेत.

## डेन्मार्कमधील शिक्षणपद्धति

चालू विसाव्या शतकात प्रत्येक स्वतन्त्र राष्ट्रात शिक्षणाची अत्यन्त प्रगति झालेली दिसून येते. त्याच्या जोरावर साऱ्या जगाला कसे झुलवावे व अनेक चमत्कृतिजन्य शोधानी मानवी ज्ञानात भर घालून एकन्दर समाजाला उपकारक कसे व्हावे ही गोष्ट शिक्षणानेच स्पष्ट केली आहे. Knowledgs is power हे तत्त्व आजच्या जगाच्या इतिहासात जितके सत्यत्वाने प्रतीयमान होते तितके पूर्वकाली कधी दिसून आले असेल किंवा नाही याची शङ्काच आहे. आपणाला जर पाश्चिमात्य राष्ट्रांच्या तोडीचे व्हावयाचे असेल तर आपल्या देशात आत्मविश्वास व राष्ट्राभिमान उत्पन्न करणारे नवीन राष्ट्रीय शिक्षण सुरू केले पाहिजे. त्या वाचून आपला निश्चित तरणोपाय नाही.

हल्लीच्या बिकट परिस्थितीत कोणत्याही राष्ट्राला जर ‘ जिवंत ’ रहावयाचे असेल तर त्या राष्ट्रातील प्रत्येक घटक सुशिक्षित झाला पाहिजे. हिन्दुस्थानसारख्या उज्ज्वल परम्परा विसरलेल्या व अज्ञानाच्या गाढ अन्धारात ठेचाळणाऱ्या देशाला आजच्या असहाय्य स्थितीत राष्ट्रीय – शिक्षणाची किती आवश्यकता आहे हे साङ्गावयास पाहिजे असे नाही. आजची सुधारलेली राष्ट्रे शिक्षणात कोणकोणत्या व कशाकशा सुधारणा करीत आहेत हे परतन्त्र हिन्दुस्थानाला कळून सुद्धा कांही उपयोग नाही. आपल्याकडे शिक्षणक्रम कोणता असावा हे ठरविण्याची जिथे आह्माला सत्ता नाही तिथे चालू शिक्षणक्रम बदलून राष्ट्रातील कोवळ्या अङ्कुराना जोमाने स्वतन्त्र वातावरणात

वाढण्याचा अवसर द्यावा एवढे स्वातन्त्र्य कुठले ? हिंदुस्थान व इतर राष्ट्रे यातील साक्षरतेच्या प्रमाणातील फरक पाहून कुणालाही खेद झाल्यावाचून राहणार नाही.

हिन्दुस्थानात शेतकरीवर्ग अत्यन्त मोठा आहे. या गरीब व अशिक्षित शेतकऱ्यांची खरी उन्नती झाल्याखेरीज इतर राष्ट्रोन्नतीच्या वल्गना फोल आहेत. भावी हिन्दवीस्वराज्यामध्ये शेतकऱ्यांचा पक्ष प्रमुख होऊन, त्यांचे हातून हिन्दुस्थानच्या राजकारणाची सूत्रे हालविली जाणार, हे सूर्यप्रकाशाइतपत सत्य आहे. तेव्हां हा समाज सुशिक्षित कसा होईल, इकडे हल्लीच्या शिक्षणाभिमान्यांनी लक्ष देणे अत्यवश्य आहे. हे लोक कोणत्या शिक्षणपद्धतीने लवकर सुशिक्षित होतील, त्यांचा कोणत्या साधनांनी व उपायाने उत्कर्ष होईल याचा विचार अगोदर केला पाहिजे. एवढ्याच करता आपणाला जगातील निरनिराळ्या राष्ट्रातील शिक्षणपद्धतीकडे नजर दिली पाहिजे. शेतकरी समाजाची अत्यन्त अल्प काळात कल्पनेबाहेर सर्वांत जास्त सुधारणा करून आपला देश इतर सर्व देशांच्या आग्रभागी बसविण्याचे श्रेय एकट्या छोट्या डेन्मार्कला आहे. आज या चिमुकल्या देशाकडे जगातील सर्व राष्ट्रांचे डोळे मोठ्या कौतुकाने लागले आहेत. डेन्मार्क-मधील नूतन शिक्षणपद्धतीने तेथील शेतकऱ्यांचे बौद्धिक योग्यतेचे प्रमाण फारच वाढले आहे. त्यांच्या शेतीत व अर्थशास्त्रात भयङ्कर उलटापालट झाली आहे. डेन्मार्कमधील एका स्वदेशाभिमानी 'मण्डळाने' या बाबतीत केलेली अलौकिक कामगिरी खरोखर कौतुकास्पद व अभिनन्दनीय आहे.

डेन्मार्कमधील सुशिक्षित शेतकरी आनन्दाने आपापल्या शेतात मन लावून काम करीत असतात. त्यांच्या जगप्रसिद्ध सुन्दर स्त्रिया त्यांच्या कामात प्रेमळपणाने मदत करीत असतात. त्यांची तरुण मुलेंदेखील शेतात मोठ्या उत्साहाने आणि उल्हासाने राबत असतात.

हिन्दी तरुणासारखे हे तरुण काही अशक्त, निस्तेज, आत्मप्रौढी मिरविणारे अगर शेतीस हलकी समजणारे नाहीत. हे सर्व शेतकरी शेतात प्रेमाने मिळून मिसळून खपत असतात. आज त्यांच्यामध्ये अगदी आधुनिक शिक्षणक्रमातून पार पडलेल्या तरुण तरुणींचे प्रमाण शेकडा पन्नासाचे वर आहे. यावरून त्यांच्यामधील शिक्षणाची आपणाला थोडी बहुत कल्पना होण्याजोगी आहे. या त्याच्या सुधारणेस त्यांच्या 'शेतकरी शाळा' अगर ज्यास ते हायस्कूल ह्मणतात त्याच मुख्यत: कारण आहेत.

या शेतकरी लोकांचे उन्नतीस जर कोणी मूलभूत कारण असेल तर तो एक डॅनिश 'कवि' आहे. याचे नाव निकोलस फ्रेड्रिक सेव्हरिन ग्रँटव्हिग असे आहे. ज्या संस्थेमधून हे सर्व शेतकरी लोक शिकून तयार होत आहेत त्या संस्थेचा पाया या कवीनेच घातला. डेन्मार्कच्या इतिहासात या कवीची कामगिरी चिरस्मरणीय व अत्यन्त प्रशंसनीय आहे. त्याच्या लिखाणाचा व व्याख्यानाचा परिणाम त्याच्या देशबान्धवावर अश्रुतपूर्व असा झाला. कोपेनहेग येथील नागरिकापुढे जेव्हां त्याने इ. स. १८४४ साली व्याख्यान दिले त्या वेळेस तर लोकानी त्याला ईश्वराच्या प्रेषिताइतपत मान दिला. तो ह्मणाला, "प्रत्येक प्राणिमात्राला ज्ञानी करणे हे आपले सर्वांचे पवित्रतम कर्तव्य आहे, आणि तेवढ्याकरता त्यांच्यामध्ये धर्माभिमानाची व स्वदेशाभिमानाची ज्योत पेटविणे अत्यवश्य आहे. प्रत्येक वस्तूतील सौन्दर्य त्याना प्रतीत झाले पाहिजे. बौद्धिक व नैतिक दृष्ट्या प्रत्येकाची वाढ कशी होईल हे त्याना पटवून दिले पाहिजे व त्या तऱ्हेने प्रयत्न करणे त्याना शक्य झाले पाहिजे. एवढ्याकरिताच शाळेतून 'जिवन्त' असे राष्ट्रीय शिक्षण निर्माण करून, ते दिले पाहिजे." लोकानी त्याचे व त्याच्या तेजस्वी विचाराचे अपूर्व उत्साहाने स्वागत केले. राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्या-

करता अनेकानी अमोल स्वार्थत्याग करण्याचे ठरविले. ग्रॅण्टव्हिगच्या विचाराना प्रत्यक्ष कृतीत उतरविण्याकरिता शेकडो लोकानी तनमन-धन अर्पण करण्याची तत्परता दाखविली. आज त्याने आरम्भिलेल्या कार्याला अत्युत्तम यश आले आहे.

शिक्षणाचे बाबतीत काटेतोल नियमाने चालणे अशक्य आहे हे जाणूनच ग्रॅण्टव्हिगने फक्त राष्ट्रीय शिक्षणाची दिशा दाखवून दिली. या शिक्षणपद्धतीत खालील तत्त्वे मुख्य आहेत.

(१) बहुतेक सर्व शिक्षण तोण्डी दिले पाहिजे. शिक्षकाने कोणतेहि पुस्तक वाचून दाखवून शिकविता कामा नये. साध्या सम्भाषणद्वारा शिक्षण झाले पाहिजे. ग्रॅण्टव्हिग म्हणतो, 'मानवाच्या शुद्ध व प्रेमळ हृदयातून येणारा स्वर पङ्ख व शक्ति देऊ शकतो.'

(२) ग्रॅण्टव्हिगच्या म्हणण्याप्रमाणे साधारण १८ ते २५ हेच वय विद्यार्थ्यांचे मनावर कायमचे संस्कार उत्पन्न करणारे आहे. तेव्हां हायस्कूलमध्ये सदरहू वयाचीच मुले घ्यावीत.

(३) कोणत्याही तऱ्हेचे औद्योगिक शिक्षण प्रत्यक्ष देण्याचा प्रयत्न करू नये. शिक्षण हे प्रत्येक विद्यार्थ्याला नवीन नवीन क्षेत्र दर्शविणारे पाहिजे. शिक्षणाच्या योगाने प्रत्येक विद्यार्थ्यामध्ये धार्मिक व नैतिक भावनांचा विकास झाला पाहिजे. प्रत्येक वस्तूतील सौन्दर्य ग्रहण करण्याची रसिकताही उत्पन्न झाली पाहिजे. वरील गुणांचा जर विद्यार्थ्यामध्ये विकास झाला तर तो विद्यार्थी शेतकी अगर कोणत्याही धन्द्यात लौकर पुढे येऊन खात्रीने यशस्वी होईल.

(४) शिक्षणक्रमात मातृभूमीचा इतिहास व काव्य हे दोन विषय प्रमुख असावेत. इतिहासाने विद्यार्थ्यांचे मनात स्वाभिमान उत्पन्न होतो. त्यातल्या त्यात मुलाना काव्यात्मक इतिहास शिकवावा काव्यातून शिकविलेला इतिहास हा नेहमी सर्वांच्या जिभेवर कायमचा नाचत राहतो व त्यामुळे तो पिढ्यान्‌पिढ्या तसाच

जिवन्त राहू शकतो. इतिहासात केव्हाही बारिकसारिक सनवार माहिती अगर किचकट तक्ते याना विशेष महत्व असू नये. इतिहासातील मुख्य मर्म मुलाना समजले पाहिजे. इतिहास शिक्षणाने त्यांचे मनात स्वतःविषयी, स्वधर्माविषयी व स्वदेशाविषयी स्वाभिमान उत्पन्न होऊन त्यांच्या कर्तृत्वशक्तीस वाव मिळाला पाहिजे.

(५) सर्व शिक्षण मातृभाषेतूनच दिले पाहिजे. प्रत्येक विद्यार्थ्यास तो शाळेतून बाहेर पडताना मातृभाषेत उत्तम रीतीने लिहिता आले पाहिजे.

(६) शाळेमध्ये मुलाना फी कमी घेत जावी; पण ती मात्र प्रत्येक विद्यार्थ्याकडून सक्तीने वसूल करून घेतली पाहिजे. कुणालाही माफी मिळता कामा नये.

(७) हायस्कूलमधील सर्व शिक्षणक्रम पुरा झाल्यावर विद्यार्थ्यास शिफारसपत्र अगर पदवी मिळावयाची नाही. ग्रॅण्टव्हिग तर पुढे आणखी म्हणतो की विद्यार्थ्याची तोण्डी परीक्षा घेऊ नये. प्रश्न विचारावयाचा झाला तर तो सर्व मुलाना एकदम विचारावयाचा व सर्वांकडून एकदम उत्तर काढावयाचे.

अशातऱ्हेने शिकवून तयार झालेल्या कोणाही विद्यार्थ्यास पदवी दिली जात नाही. (पदवीसाठी हापापलेल्या हिन्दी तरुणाना हे कितपत रुचेल बरे?). एकदा डॅनिश सरकारने असे सुचाविले की शाळेतून उत्तीर्ण होऊन बाहेर पडणाऱ्या मुलाना डिप्लोमा मिळावा व तो मिळाल्यावर कोपेनहेगच्या शेतकी शाळेत प्रवेश करण्यास मुलाना परवानगी द्यावी. यावर ग्रॅण्टव्हिगच्या अनुयायानी दिलेले मार्मिक उत्तर मोठे विचार करण्यासारखे आहे. ते म्हणाले, "या शिक्षणक्रमाचा आमचा मुख्य उद्देश तरुणांच्या सात्विक भावनाना व विचाराना व्याख्यानद्वारा व सम्भाषणद्वारा चालना द्यावयाची

हा आहे. मातृभाषेतून स्वदेशाचा इतिहास शिकवून त्यांचा स्वाभिमान व राष्ट्राभिमान जागृत करावयाचा. अशा रीतीने चर्च धार्मिक, तर आपण ऐहिक व राजकीय बाबतीत लोकांचा उद्धार करावयास झटावयाचे. मानवी आयुष्यात उच्च व उदात्त असे काय आहे, हे ज्या वेळेस प्रत्येकास समजेल त्या वेळेस आमच्या शिक्षणाचे मुख्य ध्येय साध्य झाल्यासारखे आहे. आपल्या आयुष्यात उच्च व उदात्त काय आहे याची जाणीव होणे हे इतिहासशास्त्रपारङ्गततेपेक्षा अगर एखादा शास्त्रीय शोध लावण्यापेक्षा फार महत्वाचे आहे. याचा अर्थ इतिहासशास्त्र अगर गणितशास्त्र वगैरेत त्याना प्राविण्य मिळवावयाचे नाही असा नव्हे, तर केवळ शास्त्रपारङ्गतता हे काही आमच्या शिक्षणक्रमाचे प्रधान अङ्ग नाही. आमच्या विद्यार्थ्यांना या शिक्षणामुळे उदात्त व उच्च सात्विक आकाङ्क्षा उत्पन्न होऊन त्या सफल करता आल्या पाहिजेत. केवळ परीक्षा घेऊन वर पदव्या अर्पण कराव्या हा आमच्या शिक्षणक्रमाचा बिलकूल उद्देश नाही."

इतर शिक्षणाबरोबर विद्यार्थ्यांना देशातील तत्कालिन राजकीय परिस्थितीचे यथार्थ ज्ञान करून देणे हाही या शिक्षणक्रमाचा एक हेतू आहे.

अशा तत्वावर ग्रॅण्टव्हिगच्या अनुयायानी चालविलेली (महायुद्धापूर्वी) ८० हायस्कूल्स होती. या हायस्कूलातून फी देणे सक्तीचे असल्याने अत्यन्त गरीब शेतकऱ्यांच्या मुलाना या शाळेतून शिक्षण घेणे अशक्य होई; ह्मणून त्यांच्याकरता त्यानी निराळ्या शाळा स्थापन केल्या आहेत. या शाळा वरील तत्त्वावरच चालविल्या आहेत. पण त्यात नियमित अभ्यासक्रम नाहीत.

या शाळेमधून इतिहास, भूगोल, साहित्य, अर्थशास्त्र, सृष्टीशास्त्र, शास्त्रीय शोध वगैरे विषयावर सम्भाषणात्मक वादविवाद

होतात. हे वर्ग हिवाळयात शेतकरी लोक मोकळे असतात ह्मणून तेव्हां सुरू होतात. कोणाही शेतकऱ्यास मग तो पुरुष अगर स्त्री असो या वर्गात मोफत शिक्षण देण्याची सोय केली आहे. शेतकाम सम्पल्यापासून तो सुरू होण्यापर्यन्तच्या मधल्या थोड्या काळात वरील सर्व विषय विद्यार्थ्यांना शिकविणे अर्थात् अशक्य आहे. ह्मणून एवढ्याच करता चालकानी या शाळेत नियमित अभ्यासक्रम ठेवले नाहीत. पुस्तकी शिक्षणापेक्षा या शाळातून चालत असलेल्या सम्भाषणात्मक वादविवादाने कोणत्याही विषयाचे आकलन विद्यार्थ्यास लवकर होते. असे ग्रॅण्टाव्हिग व त्याच्या अनुयायांचे मत आहे व ते बहुंशी खरेही आहे. कोणत्याही विषयाची सुरवात जिज्ञासू विद्यार्थ्याकडून होऊन त्याच्या शङ्केचे निरसन शिक्षकाकडून केले जाते. या सम्भाषणातून विद्यार्थ्याचे मनावर ज्या विषयाचा पगडा जास्त बसला असेल, त्या विषयाचा अभ्यास सुरू ठेवण्याचा तो प्रयत्न करतो. त्याला घरी निरनिराळया ग्रन्थसङ्ग्रहालयाच्या मदतीने व व्याख्याने ऐकून एकाच विषयात प्राविण्य मिळविता येते. अशा अभ्यासू लोकांचे प्रमाण तिथे फार आहे.

या शेतकरी जिज्ञासू विद्यार्थ्यांवर कोणतीही कडक शिस्तीची बन्धने लादीत नाहीत, वर्षातून थोडे महिने विद्यार्जनाकरिता शाळेत येणाऱ्या या तरुण-तरुणींना पूर्ण स्वातन्त्र्य असते; पण या स्वातन्त्र्याचा ते दुरुपयोग कधीच करीत नाहीत. शिक्षकलोक त्यांच्या बरोबर अगदी मोकळयापणाने व बरोबरीच्या नात्याने वागतात. त्यांचे घरी त्यांची भेट घेण्यास कुणाही विद्यार्थ्यास मनाई नसते. सदासर्वदा विद्यार्थ्यांची ज्ञानजिज्ञासा तृप्त करण्यास हे सुशील व प्रेमळ शिक्षक अत्यन्त उत्सुक व तत्पर असतात.

एक फ्रेन्च बाई लिहिते “ मी फ्रेड्रिक्सबर्ग येथे २०० मुली शिकत असलेल्या पाहिल्या. अर्थात् त्या सर्व मुली शेतकऱ्यांच्या होत्या.

या मुली जितक्या औत्सुक्याने प्रेमविषयक काव्यावरील व्याख्याने ऐकत असत, तितक्याच उत्सुकतेने ऐतिहासिक विषयावरील व्याख्यानेही त्या ऐकत असत. शारीरिक व्यायामात त्या आवडीने भाग घेत व त्या बरोबर एकाग्रतेने गाण्याचेही शिक्षण घेत. ”

या शिक्षणाचा मुख्य उद्देश तरुण विद्यार्थी–विद्यार्थिनींमध्ये ज्ञान–जिज्ञासा उत्पन्न करावयाची असा आहे. जर त्याना पुढे आपले ज्ञान आणखी वाढवावे असे वाटले तर त्याना अस्कोव्ह युनिव्हर्सिटीत जाऊन अभ्यास करता येतो. ही अस्कोव्ह युनिव्हर्सिटी अगदी स्वतन्त्र असून तीही ग्रॅण्टव्हिगच्या अनुयायानीच चालविली आहे.

शेतकऱ्याना मोफत व्याख्यानद्वारा व सम्भाषणद्वारा शिक्षण देऊन त्यांची मने ज्ञानाने सुसंस्कृत करावयाची हाच या शिक्षणक्रमाचा विशेष आहे व तो या शिक्षणपद्धतीने कल्पनेबाहेर यशस्वी झाला आहे. या डॅनिश शेतकऱ्याच्या बौद्धिक योग्यतेचे प्रमाण इतर कुठल्याही राष्ट्रातील शेतकऱ्यांच्या बुद्धिमत्तेपेक्षा उच्च आहे व याचे मुख्य कारण म्हणजे त्याना हल्ली मिळत असलेले शिक्षण हेच होय.

# रशियातील साक्षरता

मास्कोमधील गोष्ट —

सरकारी दुकानानजीक एक वृद्ध स्त्री रहात होती. त्या सरकारी दुकानावर एक मोठी पाटी लाविली होती. आपल्या आयुष्यात तिने हजारो वेळा ती पाटी पाहिली होती, पण बिचारीला त्या पाटीवरील अक्षरापासून काहीही अर्थबोध झाला नाही. कर्मधर्मसंयोगाने निरक्षरतेची हकालपट्टी करण्याकरिता स्थापन झालेल्या सङ्घात ती जाऊ लागली. तीन अठवड्यानन्तर ती त्या दुकानासमोर आली आणि त्या वेळी तिला ती पाटी वाचता आली व त्या अक्षरांचा

अर्थही कळला. त्या वेळी आनन्दातिशयाने ती रडू लागली. या गोष्टीवरून हल्लीच्या बोल्शेविक रशियात प्रौढ लोक कसे भराभर साक्षर होत आहेत, याची वाचकास जाणीव सहज होईल.

विसाव्या शतकात खरोखरच रशियाने हा एक अद्भुत चमत्कार करून दाखविला आहे व आपल्यावरील निरक्षरतेचा डाग पुसून टाकला आहे. इ. स. १९१७ साली रशियात राज्यक्रान्ती झाली; त्या वेळी–शेकडा ७० लोक निरक्षर होते. नन्तर पन्धरा वर्षांच्या प्रयत्नानन्तर शेकडा २६ लोक फक्त निरक्षर सापडले आणि तेही देशाच्या लाम्बलाम्बच्या भागात राहणारे लोक आढळतील. आजकाल रशियातील कोणत्याही शहरात अगर खेडेगावात पाहिले तर जिकडे तिकडे प्रौढ स्त्रीपुरुषाना साक्षर करण्याच्या शाळा आढळून येतात. सैन्यात, गिरणीत, चावडीवर, सगळीकडे या शाळांचा सुळसुळाट झालेला आढळतो.

झारच्या कारकीर्दीत सर्व जनता अशिक्षित होती आणि ती सुशिक्षित होउ नये अशीच त्या वेळी राजाची इच्छा होती. जनता सुशिक्षित झाल्याने ती राज्याचे अधिकार आपल्या हाती मागू लागेल, याची त्याला भीति वाटत होती आणि त्यामुळेच युरोपखण्डात रशिया देशातील लोक अधिक निरक्षर व अशिक्षित होते. पण १९१७ साली राजकीय क्रान्ती झाली आणि त्याचबरोबर राजकीय, सामाजिक धार्मिक व शैक्षणिक धोरणातही आमूलाग्र बदल झाला. अर्थात् आपल्या १५ कोटी अशिक्षित बान्धवास सुशिक्षित करण्याची जबाबदारी या राज्यकारभार चालविणाऱ्या मूठभर कम्युनिस्टावर आली आणि अल्पावधीत इतक्या यशस्वी रीतीने ती त्यानी पार पाडली की याला जगाच्या इतिहासात मुळीच तोड सापडणार नाही.

समाजात रूढ असलेली मते, ध्येये जर आमूलाग्र बदलावयाची असतील तर ती बदलण्यास अगोदर जनता साक्षर होणे अवश्य आहे.

याची जाणीव राशियाला झाली. कम्युनिस्टाना धार्मिक, सामाजिक, औद्योगिक व नैतिक बाबतीतहि फार मोठा बदल घडवून आणावयाचा होता व त्याना हे अशिक्षित लोक विरोध करतील अशी खात्री होती. तेव्हां या अशिक्षित लोकानी विरोध करू नये म्हणून त्याना साक्षर करण्यास सुरवात झाली व त्याना दिल्या जाणाऱ्या शिक्षणात नवीन मताची त्यानी अत्यन्त कौशल्याने पेरणी केली.

सार्वत्रिक शिक्षण होण्याकरिता राशियाने इ. स. १९१९ डिसेम्बर २६ ला 'निरक्षरतेची हकालपट्टी' करण्याच्या हुकूमनाम्यावर लेनीनची सही घेतली. तेव्हापासून आतापर्यन्त अत्यन्त कष्ट करून राशियातील प्रचण्ड निरक्षर जनतेला साक्षर करण्याचे श्रेय राशियन सरकारने घेतले.

निरक्षरतेची हकालपट्टी करण्याकरिता स्वतन्त्र मण्डळे स्थापन झाली असून राशियन सरकारचा त्याना पूर्ण सक्रिय पाठिम्बा आहे. या सङ्घाच्या शाखा देशात पसरल्या आहेत. या सङ्घाच्या सभासदानी व राष्ट्रातील सुशिक्षित तरुणवर्गाने प्रौढ स्त्रीपुरुषाना साक्षर करावे अशी ही योजना आहे. ही चळवळ चालविण्यासाठी एक वरिष्ठ मण्डळ ( Supreme council ) स्थापन करण्यात आले आहे. या वरिष्ठ मण्डळाने घालून दिलेले नियम व कार्यक्रम पार पाडण्यासाठी प्रान्तिक मण्डळे स्थापन करण्यात आली आहेत. वरिष्ठ मण्डळाची बरीच खाती आहेत. शाळांची व्यवस्था पाहणारे खाते, अभ्यासक्रम ठरविणारे खाते वगैरे बरीच खाती आहेत, ती आपापले कार्य योग्य रीतीने बजावतात.

स्थानिक मण्डळ हे प्रथमतः आपल्या वाटणीच्या क्षेत्रफळात किती लोक निरक्षर व अर्धशिक्षित आहेत याची यादी तयार करते. नन्तर निरक्षर स्त्रीपुरुषाना साक्षर करण्यासाठी अगोदर सर्व लोकांची मने वळविण्याची खटपट करतात आणि मग लोकांच्या मानाने गावात निरनिराळे अड्डे व वर्ग तयार करतात. सैन्य, गिरण्या, पेठा, वगैरे ठिकाणी असले वर्ग चालविण्यात येतात. एक स्वतन्त्र वर्ग सुरू

करण्यास निदान तीन निरक्षर लोकांची तरी जरुरी असते. या वर्गात पूर्ण निरक्षर व पूर्वी साक्षर पण काही कालाने सर्व विसरून गेल्याने बनलेले अर्धसाक्षर या लोकांचा समावेश करण्यात येतो.

ही सर्व चळवळ आर्थिक दृष्ट्या आपल्या पायावर उभी आहे. सर्व सभासद वर्गणी देतात. गिरण्या, सरकार, इतर सङ्घ आर्थिक मदत करतात. स्थानिक शिक्षणाकरिता — पुस्तकें, नकाशे वगैरे — लागणारा सर्व खर्च या पैशातून उत्तम रीतीने चालतो. या चळवळीत प्रत्यक्ष भाग घेऊन काम करणाऱ्याना निरनिराळी पदकें, फिती, बक्षिसादाखल देतात व त्याना समाजात मोठा मान दिला जातो. जिल्ह्यातील सङ्घास ब्रिगेड ह्मणतात आणि जे शिक्षक या सङ्घात विनावेतन काम करतात त्याना cultural army ह्मणतात. या वर्गात शिकण्याकरिता लहानथोर स्त्रीपुरुष सर्वजण येतात. मार्गदर्शकाचे आणि व्यवस्थेचे काम प्रौढ सुशिक्षिताकडे साधारणतः असते व प्रत्यक्ष शिकविण्याचे काम तरुणाकडे असते. तेरा ते चोवीस वर्षापर्यन्तची मुले प्रौढ निरक्षर लोकाना लिहिण्यावाचण्यास शिकवितात. तरुण मुले आपला दिवसाचा वेळ हायस्कुलात अगर कॉलेजात शिक्षण घेण्यात घालवितात व सन्ध्याकाळचा व रात्रीपैकी काही वेळ सामाजिक कार्यात — हल्ली निरक्षर लोकाना साक्षर करणे हेच मुख्य कार्य आहे — यात घालवितात. तेरा ते अठरा वयाची लहान लहान मुलेसुद्धा या कार्यात मोठ्या उत्साहाने भाग घेतात. पैशाची मुळीच आशा करीत नाहीत. ही देशभक्ती अनुकरणीय नाही असे कोण ह्मणेल ? कित्येक प्रसङ्गी प्रौढाना साक्षर करणारी ही मुले इतकी लहान असतात की त्याना खुर्चीवर उभे राहून फळ्यावर अक्षरे लिहावी लागतात. किती विचित्र आहे हे ? पण त्या लहान साक्षर मुलात दिसून येणारी कळकळ किती मोठी आहे ! अशी लहान मुले जरी शिक्षक ह्मणून काम करीत असली तरी त्याना त्याबद्दल अगोदर परीक्षा द्यावी लागतेच. ज्याने चार वर्षे

हायस्कुलात काढली असतील तो प्रौढांच्या पहिल्या वर्गाला शिकवू शकतो व ज्याने सात वर्षे काढली असतील तो दुसऱ्या वर्गातील प्रौढाना शिकवू शकतो.

या प्रौढांच्या शाळेत शिकणाऱ्यांची वये सोळा ते पन्नासपर्यन्त असतात. प्रथमतः शिकणाऱ्या प्रौढांची ' आपणास काही येणार नाही ' अशी समजूत असल्याने ते निराशावादी असतात. पण जसजशी त्याना अक्षरओळख होऊन वाचावयास येऊ लागते. तसतसा त्यांचा शिकण्याचा उत्साह वाढत जातो निरक्षरात स्त्रियांची सङ्ख्या जास्त असल्याने बहुतेक काम स्त्रियात करावे लागते. स्त्रियाना जेव्हा घरगुती अडचणीने घराबाहेर जाता येत नाही तेव्हां घरी जाऊन नर्सेस् त्याना शिकवितात व जरूर ते सर्व सहाय्य करतात.

आठवड्यातून (रशियन लोकांचा आठवडा सहा दिवसांचा असतो.) १०-११ तास शिकावे लागते. अशा रीतीने त्याना पूर्ण साक्षर व्हावयास निदान अठरा महिने लागतात साक्षरतेचे प्रशस्तिपत्र मिळावयास दोन पायऱ्या ओलाण्डाव्या लागतात. पाहिल्या नऊ महिन्यात दोन इयत्तेपर्यन्तचा शिक्षणक्रम पुरा होतो. वाचन, लेखन व साधे गणितहि या वेळी यावे लागते. पुढील नऊ महिन्यात जलद वाचन, थोडे व्याकरण, गणित इतिहास व भूगोल हे शिकावे लागते. ह्मणजे साधारणतः चौथ्या इयत्तेपर्यन्तचा अभ्यासक्रम झाल्यावर मग त्या मनुष्यास साक्षर ह्मणून प्रशस्तिपत्र देण्यात येते.

साक्षर याचा अर्थ केवळ सही करता येणे, अगर साधे लिहिणे वाचणे येणे हा नाही. रशियन साक्षरतेची व्याख्या फार निराळी आहे. ' निरक्षरतेची हकालपट्टी ' करण्याकरिता स्थापन झालेल्या या वरिष्ठ मण्डळाचे चेअरमन यानी साक्षरतेची पुढीलप्रमाणे व्याख्या केली आहे- Under the present conditions, to wipe out illiteracy does not only mean to teach to people read and

write, but is necessary to make them understand what they have read, to teach them to digest the printed matter in their heads, make a man politically literate, to create a new man. You cannot now teach without creating new men.'

केवळ लिहिता वाचता येणे हा त्यांचा हेतू नसून छापील मजकुरावर विचार करता यावा, हा त्याचा मूळ हेतू आहे. अर्थात् या त्यांच्या हेतूस अनुसरून प्रौढ लोकांच्या करिता नवीन पुस्तके तयार केली आहेत. आधुनिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक विचारांची ओळख त्याना व्हावी, कम्युनिस्टांची तत्त्वे त्यांच्या मनावर बिम्बावीत अशाच तऱ्हेची पुस्तके लिहिली जातात व तीच या शाळातून शिकविली जातात. हिन्दुस्थानात अशा तऱ्हेचा प्रयोग करून पाहिला पाहिजे. अशिक्षित लोकाना शिक्षणाची गोडी लावण्यासाठी अगोदर फार प्रयत्न करावा लागला. शिक्षणापासून आपला अत्यन्त फायदा आहे, अशी त्यांची मनोवृत्ती करण्यास त्याना फार त्रास पडला. पदार्थसङ्ग्रहालये, फिरती वाचनालये, व्याख्याने, वर्तमानपत्रे, याच्या सहाय्याने रशियाने लोकजागृती केली.

रशियाने निरक्षरतेची केलेली हकालपट्टी पाहून आश्चर्य वाटते. पुढील आकड्यावरून त्यांच्या प्रचण्ड कार्याची रूपरेखा आपल्या दृष्टीसमोर उभी राहील—

| सन | शेकडा साक्षरांचे प्रमाण |
|---|---|
| १८९७ | २८.९ |
| १९२० | ४४.४ |
| १९२६ | ५२.८ |
| १९३१ | ७२.६ |

निरक्षरता घालविणाऱ्या ज्या या स्वतन्त्र शाळा आहेत, यात प्रौढ लोकांचा आकडा सारखा फुगत आहे.

| वर्ष | स्वतन्त्र शाळातील प्रौढ विद्यार्थी |
| --- | --- |
| १९२१-२२ | ४५६००० |
| १९२६-२७ | १५५४००० |
| १९३१-३२ | १३६३१००० |

प्रत्यक्ष आकड्यापेक्षा रशियातील प्रौढ स्त्रीपुरुषात दिसून येणारा उत्साह अवर्णनीय आहे. मोठमोठ्या शहरात अनेक पुस्तकविक्रीची दुकाने उघडली आहेत, त्या दुकानात शेकडो स्त्रीपुरुष रात्रन्दिवस नवी नवी पुस्तके विकत घेत असल्याचा देखावा दृष्टीस पडतो. वाचकांची सङ्ख्या झपाट्याने वाढत असल्याने — मागणी तसा पुरवठा या न्यायाने — शेकडो नवीन ग्रन्थ प्रत्यही प्रसिद्ध होत आहेत! आता यापुढे राष्ट्रात निरक्षरता राहणे अशक्य आहे आणि थोड्याच दिवसात रशिया हा देश सर्वात सुशिक्षित झालेला आढळून येईल, असा रशियन सरकारला आत्मविश्वास वाटत आहे.

राष्ट्रीय ध्येय साधण्यासाठी सुशिक्षणाची फार जरुरी आहे. विसाव्या शतकात छापील अक्षरे अधिक परिणाम करू शकतात, याची जाणीव आह्माला झाली नाही. पाश्चात्य देशातील शेतकरी व मजूर साक्षर, नव्हे सुशिक्षित झाले आहेत. त्यांच्याशी तुलना केल्यास हिन्दुस्थानचे मजूर व शेतकरी किती कमी दर्जाचे दिसतात, याची कल्पना होईल. आता जरी सार्वत्रिक सक्तीचे शिक्षण केले तरी सर्व हिन्दुस्थान साक्षर होण्यास सहज १—२ पिढ्या होऊन जातील. थोड्याच काळात जनता साक्षर होऊन राष्ट्रीय आकाङ्क्षा पुऱ्या व्हाव्यात अशी इच्छा असल्यास रशियाचे उदाहरण पुढे ठेवणे जरूर आहे आणि त्या रीतीने प्रयत्न व्हावयास पाहिजेत. राष्ट्रातील तरुणानीहि रशियन तरुणाप्रमाणे स्वार्थत्यागपूर्वक विनावेतन कार्य करण्याची तत्परता दाखविली पाहिजे.

# स्लॉयड शिक्षण

स्लॉयड यात मूळ शब्द स्लॉज्ड् आहे. स्लॉज्ड् हा स्वीडिश शब्द आहे. स्लॉयड ह्मणजे हस्तकौशल्य – शिक्षणपद्धति. लहान मुलाना हस्तकौशल्याचे शिक्षण दिले असता त्याच्या शरीरास व मनास चलनवलन मिळून त्यांची नैसर्गिक सम्पूर्ण वाढ होते ह्मणून लहान मुलाना आत्मविकासार्थ स्लॉयड शिक्षणाची अत्यन्त आवश्यकता आहे असे कॉमीनिअस, लॉक, रूसो, पेस्टालत्सी व फ्रोबेल या शिक्षणशास्त्रज्ञानी प्रतिपादिले. यामुळे याचा शिक्षणतत्त्वात समावेश होऊन त्याला शिक्षणक्रमात बरेच वरचे स्थान मिळाले.

लहान मुलांच्या शिक्षणक्रमात हस्तकौशल्याचा उपक्रम प्रथमतः रशियातील फिनलण्डमधील शाळातून सिग्निअसच्या शिफारशीवरून इ. स. १८६२ साली सुरू झाला. स्वीडन देशात इ० स० १८७२ साली हे शिक्षण सुरू झाले. या उपक्रमाच्या योगाने सुतारकाम, कातीवकाम, नक्षीचे काम, लोहारकाम, टोपल्या विणणे, पेण्टिङ्ग वगैरे तऱ्हेचे शिक्षण मुलाना मिळू लागले. पहिल्या वीस वर्षांत अशा प्रकारचे शिक्षण साधारणतः २००० विद्यार्थ्यास मिळाले. यानन्तर इङ्ग्लण्ड, जर्मनी, फ्रान्स वगैरे देशातून प्राथमिक शिक्षणात स्लॉयड शिक्षणाचा समावेश केला गेला. प्रत्येक देशातील स्लॉयड शिक्षणपद्धतीमध्ये स्वीडनमधील स्लॉयड शिक्षण – पद्धति उत्तम आहे. ह्या पद्धतीचे मूळ उत्पादक ओटो सालोमन हे होत. ओटो सालोमनचे एक शिष्य मि० लार्सन यानी अमेरिकेत या शिक्षणाचा बराच प्रसार केला आहे. याना ह्मैसूर सरकारानी मुद्दाम बोलावून घेऊन त्यांच्या देखरेखीखाली बरेच शिक्षक तयार करून ह्मैसूर संस्थानात या शिक्षणाचा उपक्रम प्रथम त्यानी सुरू केला. मुम्बई सरकारनी स्लॉयड शिक्षण देण्याकरता लार्सनचे एक शिष्य मि० एस्. श्रीनिवासराव

याना नेमून त्यांचे हाताखाली इ० स० १९१५ साली धारवाडास २० शिक्षकांचा एक वर्ग चालविला. या तयार झालेल्या शिक्षकांचे देखरेखीखाली हल्ली मुम्बई इलाख्यात बऱ्याच ठिकाणी स्लॉयड शिक्षण सुरू केले आहे व याची वाढ थोड्याफार प्रमाणात होत आहे.

स्लॉयड शिक्षणामध्ये लहान मुलाना पहिल्या प्रथम कागदाचे काम शिकवावे. त्यानन्तर जसजशी मुले मोठी होत जातील तसतशी लाकूडकाम व तदनन्तर धातुकाम ही शिकवावीत. धातुकाम सर्वांत कठीण असल्याने ते शेवटी शिकवावे. स्लॉयड शिक्षण हे १६ वर्षांपर्यन्त द्यावे.

सर्वसाधारण हस्तकौशल्याचे काम व शिक्षणाकरिता योजिलेले हस्तकौशल्याचे काम असे कौशल्याच्या कामाचे दोन भाग करता येतील. शिक्षण देण्याच्या हेतूने योजिलेले हस्तकौशल्याचे काम याचाच स्लॉयडमध्ये समावेश होतो. या शिक्षणात मुख्यतः हात आणि डोळे याना चाङ्गल्या प्रकारे शिक्षण मिळते. हाताला अनेकविध उपकरणे योग्य तऱ्हेने वापरण्याचे कौशल्य मुलाचे आङ्गी आले पाहिजे. हातातील सूक्ष्म मज्जातन्तू व डोक्यातील सूक्ष्म मज्जातन्तू यांचा परस्पर सम्बन्ध असल्याने हाताला योग्य ते वळण मिळाल्यास त्याचा परिणाम चाङ्गल्या तऱ्हेने होतो. हाताबरोबरच डोळ्यानाही योग्य शिक्षण मिळते. हस्तकामातील सफाइदारपणा, बिनचूकपणा डोळ्याने जाणावा लागतो. एवंच स्लॉयडकामाने हात डोळे यांचे द्वारे योग्य शिक्षण मिळते. या शिवाय स्लॉयड शिक्षणाने लहान मुलाच्या शारीरिक, मानसिक व नैतिक शक्तीची वाढ होते. कित्येक वेळेला उभे राहून, कित्येक वेळेला बसून काम करावे लागते. तसेच हाताने उपकरणे वापरावी लागल्याने हाताच्या स्नायूस व्यायाम होतो. अशा रीतीने शारीरिक वाढीस एक प्रकारे मदत होते. काम बिघडता कामा नये व श्रम फुकट जाता कामा नये असा नियम असल्याने

कोणतेही काम करताना — मग ते कितीही क्षुल्लक असो — पूर्ण विचार करावा लागतो. त्यामुळे मानसिक शक्तीची वाढ होते. आपण करीत असलेला पदार्थ आपणा स्वतःकरिता आपण करीत आहोत ही भावना असल्याने मुले मन लावून काम चाङ्गल्या रीतीने करण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळे नीटनेटकेपणा, वेळेवर काम करण्याची सवय, आज्ञाधारकपणा, आत्मविकास, स्वावलम्बन वगैरे सद्गुणांची वाढ होते. या स्लॉयडच्या कामात यन्त्राचे साह्य घ्यावयाचे नसते. एक वस्तू एकाच मुलाने तयार केली पाहिजे असा नियम. अनेक मुलानी एक वस्तू तयार करावयाची नसते. यन्त्राच्या अगर दुसऱ्या कुणाच्याही साह्याखेरीज कोणतीही वस्तू एकाच मुलाने स्वतः हाताने बनविली पाहिजे हे या स्लॉयड शिक्षणातील मुख्य तत्त्व आहे.

स्लॉयड कामाचा, वर्गात निरनिराळे विषय शिकविताना फार उपयोग होतो. मात्र तो करून घेणे यात शिक्षकाला चातुर्यच लागते. गणित, भूगोल, इतिहासभूगोल, सृष्टिनिरीक्षण, शास्त्रीय विषय वगैरे विषय शिकविताना या शिक्षणाचा कमी अधिक उपयोग करून घेतल्यास त्याचा फार चाङ्गला परिणाम होतो.

## मातृभाषा

आजकाल महाराष्ट्रीय लेखकानी चालविलेली मराठी भाषेची सेवा पाहून आनन्दाने हृदय भरून येते. गेल्या २५-३० वर्षात ललित-वाङ्मयाची वाढ फारच झपाट्याने चालू आहे. मराठी भाषेत अर्थ-गौरव हा गुण अधिकाधिक उत्पन्न होऊ लागला आहे. तिला कशीही खेळविणारे अनेक कलावन्त निर्माण होऊ लागले आहेत. मराठी भाषेला नाके मुरडणाऱ्या महाराष्ट्रीय इङ्ग्रजी — भक्तानाही तिचा आधुनिक पेहेराव पाहून आपल्या कृत कर्मांचा पश्चात्ताप होऊ लागला आहे.

इतके असूनही देशाची उन्नति व्हावी तशी होत नाही, याला कारण साम्प्रतचा मातृभाषेची चालू असलेली कुचम्बणाच होय. मातृभाषेच्या उन्नतीवर देशाची उन्नति अवलम्बून आहे आणि देशाची उन्नति व्हावी अशी इच्छा असल्यास ती मातृभाषेच्या माध्यमाखेरीज होणार नाही.

इ. स. १८१३ साली ई० इं० कम्पनीने ठराव करून या देशात शिक्षणाचा फैलाव करण्याकरिता एक लक्ष रुपये खर्च करावेत असे ठरविले. परन्तु त्यावेळी शिक्षण मातृभाषेतून द्यावे की इङ्ग्रजी भाषेतून द्यावे, याबद्दल २०-२२ वर्षे वाद चालू होता. इ० स० १८३५ साली, मेकॉलेसाहेबानी आपल्या प्रसिद्ध मिनिटमध्ये इङ्ग्रजी भाषेतून शिक्षण द्यावे, असा निकाल जाहीर केला.

अशा तऱ्हेचा निकाल देण्यांत त्यांचे धूर्तता, पाताळयन्त्रीपणा, दूरदृष्टि इत्यादि गुण स्पष्ट दिसून येतात. इङ्ग्रजीमधून शिक्षण देण्यात त्याचा राजकीय डाव होताच. त्याना हिन्दी लोकाना शिकवून कारकून बनवावयाचे होते आणि हा त्याचा हेतू प्रमाणाबाहेर यशस्वी झाला. इङ्ग्रजाना या देशावर राज्यशकट चालविण्याच्या कामी निर्बुद्ध, देशाविषयी अभिमान न बाळगणारे कारकून उत्पन्न करावयाचे होते आणि त्यांना ह्या १०० वर्षात लक्षावधी कारकून तयार करवून आपला राज्यशकट चालवून दाखविला. १२ ऑक्टोबर १८३६ साली मेकॉले आपल्या वडिलाना लिहिलेल्या पत्रात लिहितात— 'इङ्ग्रजी शिक्षण घेतलेल्या लोकाना आपल्या धर्माची जाणीव, नव्हे ओळखसुद्धा राहणार नाही. असाच शिक्षणाचा फैलाव होईल तर हिन्दुस्थानातील मूर्तिपूजक व कट्टे धार्मिक लोक नामशेष होतील. यामुळे मला अत्यानन्द होत आहे.' या उताऱ्यावरून हे स्पष्ट होते की आम्हाला इङ्ग्रजीमधून शिक्षण देण्यात त्यांचा मूळ हेतू पाश्चात्य संस्कृतीचा पगडा पौर्वात्य संस्कृतीवर बसवावा हा होता आणि हा त्यांचा हेतू

सफल होण्यासाठी शिक्षणक्रमाची आखणीही त्याप्रमाणे करण्यात आली. इङ्ग्रजी शिक्षणाने आमची मने गुलाम बनविली, आमचे विचार मलूल केले, आमच्या ठिकाणी गुलामगिरीत आनन्द मानण्याची वृत्ति उत्पन्न केली आणि म्हणूनच आमचा पूर्ण अध:पात झाला.

ज्याना आपली संस्कृति टिकवायची असेल त्याना आपल्या शिक्षणाची इमारत मातृभाषेवरच उभारणे भाग आहे, त्याखेरीज भागणार नाही. जगातील कोणत्याही देशात पहा, सर्व शिक्षण मातृभाषेतून दिले जाते. ज्या देशात मातृभाषेतून शिक्षण दिले जात नाही, ती राष्ट्रेच फक्त पारतन्त्र्यात दिवस कण्ठीत आहेत. हिन्दुस्थानात इङ्ग्रजीमधून शिक्षण दिले जाते हे ऐकताच पाश्चात्य देशातील लोकाना मोठे आश्चर्य वाटते. ‘ शिक्षण आणि ते इङ्ग्रजीतून ! मातृभाषेतून नाही ! ’ या विचाराने त्याना हसूच येते, ही त्यांची विचारसरणी आणि आम्ही इङ्ग्रजी शिकताना मातृभाषेकडे पूर्ण दुर्लक्ष करतो. एवढेच नाही तर इङ्ग्रजीची स्तुती करून आम्ही आमच्या भाषेला हीन ठरवितो, मराठीतील वाङ्मयभक्तानाही कमी किमतीचे लेखतो. इङ्ग्रजी काव्यांचे आह्माला रसाविष्करण करता येते पण मराठी वाङ्मयातील अर्थसुद्धा नीट कळत नाही, ही किती शोचनीय स्थिति आहे ?

आह्माला मराठीतून नीट पत्रसुद्धा लिहिता येत नाही; पण इङ्ग्रजीतून बन्दच्या बन्द सुन्दर लिहिता येतात. याबद्दल खन्त न वाटता उलट अभिमान वाटतो. किती दुर्दैवाची गोष्ट ही ! पार्लमेण्टमध्ये लॉइड् जार्जसारखे असामान्य देशभक्त इङ्ग्रजी भाषेत न बोलता वेल्शभाषेत बोलण्याचा अट्टाहास करतात, याचा अर्थ काय ? जेत्यांच्या भाषेतून शिक्षण घेतल्याने जित जेत्यांच्या संस्कृतीचे भाट बनतात हा सिद्धान्त आहे. जितांच्या संस्कृतीवर आक्रमण करण्यास जेते नेहमी आपली भाषा जितावर लादतात, असे इतिहास छातीला हात लावून

साङ्गत आहे.

मातृभाषेतून शिक्षण घेतल्याने आपला राष्ट्राभिमान व संस्कृतीचा अभिमान जागृत होतो. भाषेचा आणि तीमधील विचारांचा परिणाम आपल्या मनावर, विचारावर व रक्तावरही होत असतो ही गोष्ट विसरून चालणार नाही. मातृभाषेतून जर आपण शिक्षण घेतले तर त्या योगाने आपला राष्ट्राभिमान जागृत होईल ह्मणूनच आपणाला इङ्ग्रजीमधून शिक्षण दिले गेले. हा दुष्परिणाम स्पष्ट दिसत असूनही अजून मुम्बई विश्वविद्यालयाने विद्यालयातून मातृभाषेतून शिक्षण सुरू केले नाही. या बाबतीत नागपूर विश्वविद्यालयाने आघाडी मारून महाराष्ट्राला लाजविले आहे.

मातृभाषेतून शिक्षण देण्यास सुरवात झाल्यावर त्या त्या विषयाची ग्रन्थसम्पति वाढेल आणि पर्यायाने मराठी भाषेचा अमोल फायदा होईल. या सर्व गोष्टी विचारात घेतल्या तर मातृभाषेत राष्ट्राचे भवितव्य कसे गुन्तले आहे, हे स्पष्ट कळून येईल. मातृभाषेचा अभिमान प्रत्येकाच्या अन्तःकरणात असला पाहिजे. तिला पुष्ट करण्याकरिता, तिला अलङ्कृत करण्याकरिता प्रत्येकाने झटले पाहिजे. मातृभाषेचा अभिमान प्रत्येकाच्या अन्तःकरणात उत्पन्न व्हावा एवढीच इच्छा आहे.

## ध्येय-केन्द्र

आरम्भिलेल्या कोणत्याही सत् कार्यात यश मिळविणे हे प्रत्यकाचे हातात आहे. या जगात असे काही लोक आहेत की त्याना निराशा कधी माहीतच नसते. त्यांच्या कार्यात आलेली विघ्ने त्याना पहाताच आल्या पाउली परत जातात; एवढेच नव्हे तर त्याना या विघ्नापासून उलट हुरूपच येते; त्यांचे कार्य सुकर होते. योग्य परिस्थिति नाही, लोकमताचा वारा प्रतिकूल आहे, जनता मदत करीत नाही,

साम्पत्तिक स्थिती हलाखीची आहे, असले रडगाणे हे लोक कधीच गात बसत नाहीत. ते स्वतः चाङ्गली व अनुकूल परिस्थिती उत्पन्न करतात. ध्येयमार्गात आलेल्या विघ्नाना ते जुमानीत नाहीत. त्यांची दृष्टी फक्त ध्येयाकडे असते. मार्गात आलेल्या वाईट गोष्टीस धैर्याने तोण्ड देऊन चाङ्गल्या गोष्टीचा जास्तीत जास्त फायदा करून घेण्यास ते अत्यन्त तत्पर असतात; व तो फायदा करून घेऊन ते हुशारीने पुढील मार्ग आक्रमण करतात. तुह्मालाही तसे करता येईल पण दाण्डगा आत्मविश्वास पाहिजे.

तुमची शरीरप्रकृती निरोगी व वृत्ती आनन्दी असू द्या. सदासर्व-काल तुमचा चेहरा हासरा व आनन्दी ठेवा. तुमच्याकडे पाहिले ह्मणजे पाहणाराचे मनात तुमच्याविषयी आदर व आनन्द उत्पन्न झाला पाहिजे. तुह्माला पाहून पाहणाराने नाक मुरडू नये. तुमच्या सान्निध्याची लोकानी नेहमी उत्कट इच्छा करावी. नेहमी तुमचे मस्तक ताठ असू द्या. छाती पुढे काढा, नेहमी सूर्यप्रकाशात वावरा. मित्राशी व शत्रुशी देखील हसतमुखाने व मोकळया मनाने वागा. आपल्याविषयी लोकांचे मनात नाहक गैरसमज उत्पन्न होईल अशी भीती केव्हाच मनात आणू नका. शत्रुविषयी विचार करण्यात आपला अमूल्य वेळ व्यर्थ गमावू नका. वेळेचा सदुपयोग करा. तुह्माला काय करावयाचे ते अगोदर ठरवा. ध्येयावर दृष्टी केन्द्रीभूत करा व ते ध्येय गाठण्याचा प्रयत्न नेटाने व उत्साहाने करा. विघ्नाचे हसतमुखाने स्वागत करा. नाउमेद होऊ नका. आचरण शुद्ध व पवित्र ठेवा. तुह्माला ध्येय लगेच गाठता येईल.

ध्येयकेन्द्र गाठताना मनात कशाचीही व कुणाचीही वृथा भीती बाळगू नका. अविरत कार्य करीत रहा. कार्य करीत असता मनात भीती उत्पन्न झाली की यश लाम्ब गेलेच ह्मणून समजा. निर्भय वृत्तीच्या मनुष्यास यशलाभ हटकून व लौकर होतो. ध्येयकेन्द्राकडे जात असता

या संसारसागरात द्वेशाचे खडक जागोजाग आढळून येतात. त्याना मोठ्या कौशल्याने हाकलून आपली प्रयत्ननौका ध्येयकेन्द्राकडे वळह-वली पाहिजे. लोक तुमचा द्वेष करतील, करूद्यात. तुम्ही स्वतः मात्र कुणाचाही द्वेष करू नका. सर्वांविषयी तुमचे प्रेम असू द्या.

राजा येऊनि पूजा करी। मूर्ख मारी तोण्डावरी
परी समसमान अन्तरी। वृत्ती जयाच्या

असे होण्याचा प्रयत्न करा. महात्मा गांधींच्या उज्वल व पवित्र चरित्राचे निरीक्षण करा, मनन करा. 'कोण्याही भूताचा न घडावा मत्सर' या स्थितीप्रत पोहोचण्याची पराकाष्ठा करा. तुमचे ध्येय तेजस्वी व पवित्र असू द्या. ते गाठताना त्यावर एकाग्रतेने दृष्टी रोखा. तुमच्या सात्विक हृद्फलकावर तुमचे पवित्र ध्येय सुविचार कुंचल्याने रेखाटून ठेवा. क्षणोक्षणी, पावलोपावली ध्येयाचा ध्यास लावून घ्या. त्याच्यावाचून दुसरा विचार करू नका. तुम्ही खात्रीने यशस्वी व्हाल.

तुमचे विचार पवित्र असू द्या. तुम्ही सुसङ्गत व योग्य मार्गाने विचार करण्यास शिका. तुमची ध्येयपूर्तीची इच्छा अत्यन्त प्रबल असू द्या. जितकी ध्येय गाठण्याची इच्छा प्रबल तितकी कार्यसिद्धि लौकर. प्रत्येक प्राणिमात्राच्या उत्क्रान्तीची हीच पद्धत आहे असे डार्विन व स्पेन्सर साङ्गतात. प्रत्येक प्राणिमात्राने ज्या ज्या तऱ्हेची अत्यन्त प्रबल इच्छा धरली त्या त्याप्रमाणे ते उत्क्रान्त होत गेले. घोडा वेगाने धावतो याचे कारण त्याने तशी तीव्र इच्छा धरली व धरतो म्हणून. पक्षी आकाशात संचार करतात याचे कारण त्यांची तशी उत्कट इच्छा होती व आहे म्हणून. प्रत्येक गोष्ट प्राणिमात्राच्या इच्छेनुरूप घडून आली. याचे कारण त्यांची तीव्रतम इच्छा होती —नव्हे त्यानी त्या गोष्टीचा ध्यासच घेतला होता, लहान भ्रमरींचीच गोष्ट घ्याना. कोणी तिला कुम्भारीण म्हणतात. ही भ्रमरी एक हिरवी आळी धरून आणून आपल्या घरात ठेवते. ती वारंवार

बाहेरून येऊन तिला टोचून जाते. त्यामुळे ती लहान आळी त्या भ्रमरीचा सारखा ध्यास घेते. तिला त्या भ्रमरीशिवाय काहीच सुचत नाही. 'आता इतक्यात भ्रमरी मला येऊन टोचेल.' अशी तिला काळजी—ध्यास लागतो. या तीव्र ध्यासाने काही काळाने ती आळी स्वतःच भ्रमरी होते, तिला पङ्ख फुटतात व ती उडून जाते. एवंच कोणत्याहि गोष्टीचा ध्यास घेतला व प्रयत्न केला तर मनुष्य त्याप्रमाणे अवश्य बनेल. पण ध्यास मात्र तीव्र पाहिजे. प्रत्येकाला या गोष्टी पटतात पण ते त्याप्रमाणे वागत नाहीत, आणि म्हणूनच त्यांची उत्क्रान्ती लवकर होत नाही. ध्येय गाठण्याविषयी जितकी तळमळ जास्त, जितका उत्साह दाण्डगा, तितका कार्यभाग अत्यन्त लवकर होतो हे निश्चित समजा. मात्र त्याबद्दल ध्यास घेतला पाहिजे.

ध्येयमार्गात चाङ्गले मित्र मिळावे म्हणून आपण फार प्रयत्न करतो. पुष्कळांची आपण ओळख करून घेतो पण शेवटी विश्वासू व सहृदय मित्र मिळत नाही म्हणून आपण कष्टी होतो. याचे कारण एकच आणि ते चाङ्गले मित्र हुडकण्याचे अगोदर आपण स्वतः चाङ्गले मित्र होण्यास लायख नसतो. तुम्ही स्वतः चाङ्गले मित्र होण्यास शिका म्हणजे तुम्हाला योग्य व विश्वासू मित्र तेव्हांच मिळतील.

दुसरे मित्र हुडकण्याचे अगोदर मित्राशिवाय जगात राहता येईल असा अभ्यास तुम्ही करा. तुम्ही स्वतः पूर्ण स्वावलम्बी बना. आपला कोणताही भार दुसऱ्यावर टाकू नका. उलट दुसऱ्याना निरपेक्ष मदत करण्यास शिका. स्वावलम्बी व दुसऱ्यास मदत करण्यास सज्ज असलेल्याला मित्रांचा काय तोटा !

एकान्तवासात आयुष्य काढल्याने तुम्हाला सन्मित्र मिळण्यास त्रास पडणार नाही. निसर्गात बागडा, रानावनातून व दऱ्याखोऱ्यातून स्वैर संचार करा. शुद्ध हवेत फिरा, सूर्यप्रकाशात हिण्डा, जनसम्पर्क लागू देऊ नका, निसर्गाशी तादात्म्य पावा; एकान्त चान्दण्यारात्री

शुद्ध भावनेने निसर्गाच्या पायाशी लोळण घ्या. " या डोळ्यानी जे जे मी पाहातो त्यातील मी स्वतः एक भाग आहे, मला नेमून दिलेले कर्तव्यकर्म मला यथासाङ्ग व प्रामाणिकपणाने पार पाडले पाहिजे, माझे पवित्र ध्येय मला गाठलेच पाहिजे " असे तुम्हाला वाटू द्या. नेहमी पवित्र विचार करा, चाङ्गल्या वासना धरा. निसर्गात विहार केल्याने तुमचे अन्तःकरण शुद्ध होईल. तुमच्या हृदयात पवित्र विचार व सद्भावना उद्भूत होतील. तुमच्यामध्ये आत्मतेज वाढेल. आत्मशुद्धी झाल्यावर तुह्मी स्वतः लोकमित्र व्हाल—तुह्मालाही लागेल तितके जिवास जीव देणारे मित्र मिळतील तुमचा ध्येयमार्ग सुलभ व निष्कण्टक होईल. तेजस्वी बना. मस्तक ताठ व छाती पुढे करून चाला. ध्येयकेन्द्राकडे उत्साहाने पाऊल टाका. तुह्माला यश हे ठेवलेलेच आहे.

## महात्मा गान्धींचा आचारधर्म

सत्यापरता नाही धर्म, । सत्य तेचि परब्रह्म ।
सत्यापासी पुरुषोत्तोम, सर्वकाल तिष्ठत ।

मुक्तेश्वर, आदिपर्व अ० १६ ओ० २११

दास्यशृङ्खला तोडून स्वतन्त्र होण्याचा प्रयत्न आज जगातील प्रत्येक परतन्त्र राष्ट्र करीत आहे. या प्रत्येक परतन्त्र राष्ट्राचे ध्येयकेन्द्र एकच आहे परन्तु ते गाठण्याचे मार्ग मात्र भिन्न आहेत. महात्मा गान्धींनी व पर्यायाने अखिल हिन्दुस्थानने अनत्याचाराचा मार्ग स्वीकारला आहे. महात्मा गान्धींसारख्या सत्त्वशील व पुण्यश्लोकाच्या धुरीणत्वाखाली हिन्दुस्थान आपली परम्परा राखील असे ह्मणण्यास काहीच प्रत्यवाय नाही.

अनत्याचाराचा मार्ग आचरणात आणावयास अत्यन्त कठीण आहे काम क्रोधादि षड्रिपूंना पूर्ण कह्यात आणल्याखेरीज हा मार्ग

चोखाळणे अशक्य आहे. महात्मा गान्धीना या मार्गात अनेक सङ्कटे आली परन्तु त्या सर्वांना त्यानी आनन्दाने व हसत मुखाने तोण्ड देऊन आपला अद्वितीयपणा व अलौकिकपणा सिद्ध करून दाखविला.

आज सर्व राष्ट्र महात्माजींच्या पाऊलावर पाऊल टाकायला तयार झाले आहे. सत्यमार्गाचे अवलम्बन करून अनत्याचाराने स्वातन्त्र्यसाधनार्थ आपला प्राणही अर्पण करण्यास आज राष्ट्रातील प्रत्येक घटक तयार झाला आहे. याला कारण महात्माजींची आचारप्रवृत्तीच होय.

सत्य हा गान्धींचा आत्मा आहे. असत्यमार्गाचे अवलम्बन केव्हाही करावयाचे नाही हा त्यांचा बाणा आहे. जगात सत्य हे अत्यन्त श्रेष्ठ आहे व त्याचा भङ्ग केव्हाही न होऊ देणे हे मनुष्याचे पवित्रतम कर्तव्य आहे. महात्मा गान्धींची सत्यावर अचल व अढळ श्रद्धा असून आतापर्यन्त सत्याला धरूनच वागत आहेत. त्यामुळे त्यांच्या आचरणाचा परिणाम सर्व राष्ट्रावर झाला आहे.

अहिंसामार्गाने हिन्दुस्थानातील अशान्ततेचा उपसंहार करून हिन्दुस्थानाला स्वातन्त्र्याचा मङ्गल मार्ग दाखवावयाचा व अशा रीतीने सर्व जगाला एक नवीन मार्ग दाखवावयाचा हे महात्माजींच्या अवताराचे प्रमुख कार्य आहे. अहिंसामार्गाने जाऊन सर्व प्राणि-मात्रावर निर्व्याज प्रेम करून मातृभूमीची व त्याबरोबरच सर्व प्राणिमात्रांची स्वार्थत्यागपूर्वक सेवा करण्याची हे त्यांच्या आचार-धर्माचे प्रमुख लक्षण आहे.

महात्माजी हे मित्राविषयी व शत्रुविषयी देखील प्रेम आदर बाळगतात. त्यांचे ठिकाणी अखिल मानवप्राण्याविषयी दया व वात्सल्यभाव आहे. सत्याचे व शीलाचे प्रभावावर हिन्दुस्थानाला स्वतन्त्र करू पाहणारे ते एक महात्मे आहेत. त्याग हे त्यांचे व्रत आहे.

त्यांची मूर्ति बावळी पण कीर्ति मोठी आहे. शरीराने दुबळा, वृद्ध असून आपले अमोल आयुष्य एका लहान वस्त्रावर काढीत असलेला हा महात्मा पाहून आश्चर्य आणि त्याचबरोबर अत्यादर वाटतो. परदेशी भारी किमतीच्या व निरनिराळ्या तऱ्हेच्या वस्त्रानी विभूषित होणारे सुशिक्षित लोक व हातमागावरील लहानशा खादीच्या तुकड्यावर राष्ट्राकरता अविश्रान्त मेहनत करणारा महात्मा यांचे मधील जमीन अस्मानाचे अन्तर पाहून या महात्म्याविषयीची पूज्यबुद्धी अधीकच वाढते. ‘ आधी केले आणि मग सांगितले ’ ही त्यांची वृत्ति आहे. स्वतःच्या आचरणाने लोकाना उदाहरण घालून द्यावयाचे यात त्यांचा मोठेपणा आहे.

ज्ञानार्जनानन्तर लोककल्याणाची तीव्र तळमळ त्यांचे अन्तःकरणात उत्पन्न झाली. हिन्दुस्थानच्या परिस्थितीचे अमूलाग्र व मार्मिक अवलोकन केले. हिन्दुस्थानच्या असाहाय्य व केविलवाण्या स्थितीने त्यांचे अन्तःकरण विदीर्ण व व्याकूळ झाले. कोणत्या मार्गाने गेले असता हिन्दुस्थानचा फायदा होईल याचा त्यानी विचार केला. एकान्तवासात दिवस घालवून त्यानी आत्मशुद्धि करून घेतली. निसर्गाशी ते एकरूप झाले. निसर्गात हिण्डले, बागडले. निसार्गातील प्रत्येक गोष्टीचा त्यांचे हृदयावर सात्विक परिणाम झाला. याच ठिकाणी त्यानी ध्येयशुद्धि व आत्मशुद्धि करून घेतली; ध्येयाचे मनन केले, चिन्तन केले. निसर्गातील प्रत्येक सात्विक वस्तूच्या सान्निध्याने त्यांचे अन्तःकरण निर्व्याज आणि प्रेमळ झाले व अशारीतीने त्यांची आत्मशुद्धि झाली. प्राणिमात्राविषयी त्याचे हृदयात समता उद्भूत झाली. त्यांच्या आकाङ्क्षा उच्च आणि सात्विक बनल्या. त्यांचे आत्मिक सामर्थ्य वाढले. ते अन्तस्फूर्तीने बोलू लागले. त्यांच्या प्रत्येक शब्दाला आत्मिक सामर्थ्याने अत्यन्त महत्त्व आले, म्हणूनच लोक त्याना आज ईश्वराच्या प्रेषिताइतका मान देऊ लागले आहेत.

## शठं प्रति शाठ्यं की सत्यं ?

जगामध्ये नेहमी दोन प्रकार दिसून येतात. एक शठं प्रति शाठ्यं व एक शठं प्रति सत्यं पहिल्या मार्गाने जाणारे लोक अधिक. दुसऱ्या मार्गाने असामान्य व तेजस्वी महात्मेच जावयाचे. सर्वसाधारण व्यवहारात सामान्य लोक शठं प्रति शाठ्यं हेच तत्त्व आचारणात आणतात. परन्तु या मार्गाने गेले असता जगाच्या सुखात भर न पडता दुःख मात्र वाढत जाते हे विचारान्ती सहज कळून येईल. अरे म्हटले असता कारे म्हणण्याची प्रवृत्ति सर्वसाधारण लहान मुलापासून थोरापर्यन्त, अशिक्षितापासून ते सुशिक्षितापर्यन्तही आढळून येते. जशास तसे ही प्रवृत्ति सामान्य जनात फार परन्तु महात्मा गान्धीनी चोखाळलेला मार्ग अत्यन्त उच्च व श्रेष्ठ प्रतीचा आहे व त्याचबरोबर तो बिकटही आहे, हे कोणालाही नाकबूल करता येणार नाही.

" अक्कोधेन जिने कोधं असाधुं साधुना जिने
जिने कदरियं दानेन वाच्चनालीक वादिनं "

क्रोधाला अक्रोधाने जिङ्कणे, दुष्टाला चाङ्गल्या व सत्यमार्गाने जिङ्कणे, कृपणाला दानाने व खोटे बोलणाऱ्यास खरे बोलून जिङ्कणे या उदात्त तत्त्वाबरहुकूम महात्मा गान्धी आजपर्यन्त वागत आले आहेत. शठाबरोबर सत्यमार्गाने वागावयाचे हा गान्धींचा बाणा आहे. आशारीतीने वागून त्यांचा मोठेपणा तावून सुलाखून निघाला आहे.

क्षमाशील वृत्ति, सत्यमार्गाचे अवलम्बन, निर्मल शील व उदार स्वभाव या सद्गुणसमुच्चयाने महात्माजींनी जगातील प्रत्येक व्यक्तीला मोहून त्यांची हृदये आपणाकडे आकर्षून घेतली आहेत. लोक-कल्याणाची त्याना तीव्र तळमळ आहे व तेवढ्याकरता त्यानी आपले सर्वस्व अर्पण केलेले आहे. शान्ती ही महात्माजींच्या रोमरोमात भिनली आहे आणि ह्मणूनच त्याना शूर ह्मणणे अधिक श्रेयस्कर व उचित आहे. त्यानी कामक्रोधादि षड्रिपूना आपल्या ताब्यात ठेविले आहे.

शूर मनुष्य मनोविकाराच्या स्वाधीन कधीही होत नाही. शूर पुरुषाला क्रोध उत्पन्न होत नाही. क्रोध हा कुणाही सामान्य व्यक्तीच्या ठिकाणी उत्पन्न होतो. परन्तु क्षमा ही अत्यन्त प्रयत्नानेच सम्पादावी लागते.

महात्माजी आचरीत असलेली तत्त्वे अत्यन्त आदरणीय आहेत, याबद्दल कुणाचेही दुमत होणे शक्य नाही. परन्तु अत्यन्त थोर लोक ही तत्त्वे आचरणात आणण्याचा प्रयत्न करतात, याला कारण ही तत्त्वे आचरणात आणावयास फार कठीण वाटतात. सर्वसाधारण मानवप्राणी आपल्या मनोविकारांचा गुलाम असल्याने ही तत्त्वे किती जरी आदरणीय असली तरी ती कुणी सहसा आचरणात आणीत नाही. पण महात्माजींचे बाबतीत आदरणीय व आचरणीय असा भेदच नाही. जी तत्त्वे त्याना चाङ्गली वाटली, सत्याला अनुसरून आहेत अशी पटली, जिवाच्या मोलाने ती आचरणात आणावयाची हा तर त्यांचा बाणा आहे. अशक्य व असाध्य त्याना कोणती गोष्ट वाटत नाही. अशा तऱ्हेने सर्व जगाला आगोदरच स्वतःच्या कृतीने उत्तम धडा घालून द्यावयाचा अशी त्यांची आचरणमीमांसा आहे. उच्चारापेक्षा ते आचाराला फार महत्त्व देतात. लोकाना कोरडा उपदेश करावयाचे आगोदर ते स्वतःच त्याप्रमाणे वागून दाखवितात. त्यांच्या आचरणावरून लोकानी काय बोध घ्यावयाचा तो घ्यावा. कोणत्याही कार्याविषयी पूर्ण विचार करून स्वतः त्याप्रमाणे कार्याला सुरवात करावयाची; प्रयत्नाची शिकस्त करून ते कार्य यशस्वी करून दाखवावयाचे हीच गान्धींची आचारपद्धति आहे.

महात्माजींनी आचरणात आणून घालून दिलेला मार्ग हा आपल्या राष्ट्रापुरता नसून सर्व जगाने तो आचरण्यास योग्य असा आहे. जगातील प्रत्येक लहान मोठे राष्ट्र स्वतन्त्र असावे ही त्यांची उत्कृष्ट इच्छा आहे. कोणत्याही राष्ट्राने कोणाही राष्ट्रावर जुलूम जबरदस्ती करता उपयोग नाही असे त्याना वाटते. जगातील

प्रत्येक राजकारणी मुत्सद्यानी सत्य, अहिंसा व प्रेम या तीन प्रधान-मार्गाने राज्य चालविले पाहिजे. असे त्याना वाटते. असत्य मार्गाने केलेले कोणतेही कृत्य अन्ती कधीही सफल होणार नाही. तसेच असत्य व जुलमी मार्गाने चालविलेल्या राष्ट्रात कधीही शान्तता नान्दणार नाही अशी त्यांची पूर्ण खात्री आहे.

महात्मा गान्धींचे निर्मल चारित्र्य, सत्यनिष्ठा, अहिंसातत्त्वावरील अचल व अढल श्रद्धा पाहून प्रत्येकजण दिपून जातात व ह्मणूनच भिन्नभिन्न लोक त्यांच्या भिन्न गुणाने आकर्षिले जाऊन त्यांचा मोठेपणा कबूल करतात. महात्माजींची धर्ममते ही कोणत्याही धर्माच्या मनुष्याला आचरणात आणता येण्यासारखी आहेत. सत्यधर्माने आचरण करणाऱ्या महात्माजीमध्ये सर्व धर्मांची उदात्त तत्त्वे एकरूप झाली आहेत महात्माजींचा धर्म हा सत्यावर अधिष्ठित झाला असून तो आचारप्रधान धर्म आहे.

त्यांच्या प्रत्येक कृतीत सत्य भरलेले आहे. सत्य हाच त्यांचा धर्म आहे सत्य हाच त्यांचा परमेश्वर आहे. मग अशा सत्य मार्गाने चालणाऱ्याचा पाठिराखा परमेश्वर का नसणार बरे? म्हणूनच आज त्यांच्या सत्यधर्माचा डङ्का त्रिखण्ड गाजत आहे.

## शिवराज्याभिषेक

शिवरायाचें आठवावें रूप। शिवरायाचा आठवावा प्रताप।
शिवरायाचा आठवावा साक्षेप॥ भूमण्डळी॥

× × × ×

शक्तीनें मिळती राज्ये। युक्तीने यत्न होतसे।
शक्ति युक्ति जये ठायी। तेथे श्रीमन्त धावतो।

यावनी सत्तेने आर्यावर्तात धुमाकूळ माण्डला होता. गरीब असाहाय्य हिन्दूंचा अनन्वीत छळ सुरू झाला होता. गरीब बाया

बापड्यांच्या अङ्गावर दिवसाढवळ्या घाला पडू लागला होता. गुलामगिरीत खितपत पडलेले नामर्द हिन्दू लाचार होऊन यवनाची ताबेदारी पत्करून राहिले होते. ब्राह्मणाचे ब्राह्मणत्व भाताच्या तपेलीत व विटाळ-चाण्डाळात उरले होते. क्षत्रियानी प्रजापालनाचे पवित्र कार्य झुगारून देऊन स्वतःच्या जीवापायी व स्वार्थापायी आपल्या तेजाचा व देशभक्तीचा होम करून ते यवनांचे गुलाम होऊन राहिले होते. सर्व वर्णांनी शूद्रवृत्तीचा स्वीकार केला. हिन्दूचे असङ्ख्य देव-गरीबाचे कर्दन काळ-जबरदस्त यवनांच्या टोल्याखाली फुटून भरडून निघत होते. हिन्दूंची जाज्वल्य, सोवळी व जाग्रत देवस्थाने गारठून गेली होती. जिकडे तिकडे हलकल्लोळ माजून राहिला होता. कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नाही, अशी स्थिती प्राप्त झाली तेव्हां आपल्या मातृभूमीला यवनाच्या जाचातून सोडविण्यास शिवाजीमहाराज अवतीर्ण झाले. महाराजानी महाराष्ट्राच्या हीनदीन स्थितीचे आकलन केले. त्यांचे कोमल हृदय दुखःतिशयाने भरून आले. आपल्या मायभूला स्वतन्त्र करण्यासाठी, गरीब जनतेला यवनांच्या मगरमिठीतून सोडविण्यासाठी व गोब्राह्मणाचा प्रतिपाल करण्यासाठी त्यानी मूठभर मावळयांच्या सहाय्याचे जोरावर स्वराज्य स्थापनेस आरम्भ केला. आपल्या अलौकिक शौर्याने व बुद्धिबळाने लोकरच त्यानी पुणे प्रान्ती आपली सत्ता प्रस्थापित केली. स्वराज्य स्थापनेच्या कामात त्यांच्याच मराठे क्षत्रिय बान्धवानी त्याना वेळोवेळी आडथळे आणले पण असल्या स्वराज्यद्रोही लोकाना त्यानी काट्याप्रमाणे काढून टाकले. दुष्टाना दण्डण करण्यात त्यानी आपपरभाव दाखविला नाही. फिरङ्गोजी नरसाळा, बाजी प्रभू, मुरारबाजी, बाळाजी आवजी, नेताजी, तानाजी यासारख्या एकापेक्षा एक अमूल्य नररत्नांचा सङ्ग्रह महाराजानी कुशलतेने केला. उत्तरेस प्रचण्ड मोगल बादशाही, पूर्वेस पराक्रमी आदिलशाही; दक्षिणेस व पश्चिमेस यवनाङ्कित स्वार्थी व देशद्रोही

हिन्दु राज्ये, अशा रीतीने सर्व बाजूने शत्रु उठाव करीत असताही शिवाजीमहाराजानी आपल्या अप्रतीम रणकौशल्याने व अद्वितीय राजकारणपटुत्वाने या सर्व बलवान् शत्रुना धैर्याने तोण्ड देऊन नामोहरम करून टाकले. महाराजाना जितकी सङ्कटपरम्परा जास्त तितकी त्यांची बुद्धिमत्ता प्रखर चाले. महाराजानी अफजुलखानाला ठार केला, सिद्दीजोहारचे हातावर तुरी देऊन सारी कोकणपट्टी काबीज केली. शाहिस्तेखानाला त्याच्या राहत्या ठिकाणी जाऊन पळवून लावले. एक का दोन अनेक धाडसाची कृत्ये पाहून मन थक्क होऊन जाते, कल्पनेला तणावा सहन होत नाही, वर्णन करताना शब्द अपुरे होऊन, भाषा थिटी पडते. सर्व महाराष्ट्रात त्यानी नवचैतन्य उत्पन केले. सह्याद्रीची दरीखोरी स्वातन्त्र्याच्या मङ्गल नादाने भरून टाकली. कडेकपारीतून स्वातन्त्र्याचे राष्ट्रगीत घुमू लागले. सर्व महाराष्ट्र महाराजांच्या नावाचा जयजयकार करू लागला. त्यांच्या पाउलावर प्राण द्यावयास सारा महाराष्ट्र स्वेच्छेने सज्ज झाला. महाराजानी एकामागून एक असे अनेक प्रान्त काबीज केले. अगणित सम्पत्ती मिळविली. मराठ्यांचे सैन्य पहाताच शत्रुची दाणादाण उडून त्याना पळता भुई थोडी होई. त्यांच्या नावाचा विलक्षण दरारा साऱ्या भारतवर्षात बसून गेला. त्यांची सत्ता अफाट होती. शक्ति अमाप होती. महाराज हे एक अनभिषिक्त सम्राट गणले जात होते. तरी पण मोङ्गल बादशाहा त्याना सरदार, जमीनदार म्हणूनच ओळखीत असे. शिवाजी महाराज हे स्वतः मूर्धाभिषिक्त राजे नसल्याने बादशहा त्याना आपल्या बरोबरीचे न समजता हलके व बण्डखोर म्हणून लेखी. महाराजाना त्यांच्या बरोबरीचे काही मराठे सरदारही राजाइतपत मान देण्यास तयार नसत. ' जरी दक्षिणेतील तेजस्वी व मानी सरदार शिवाजीला रणाङ्गणावर आनन्दाने सहाय्य करीत तरी पण खाजगी बाबतीत त्याला मोठेपणा देण्यास ते तयार नसत. दरबारी जेवणाच्या प्रसङ्गी शिवाजी महाराजाशी मोहिते,

निम्बाळकर, सावंत, घोरपडे वगैरे सरदारापेक्षा उच्चासनावर बसावे यास ते विरोध करीत असत.' (किं. पारसनीस म. इ. भा. १ पा. २४४.) एकन्दरीत शिवाजी महाराजाना त्यावेळचे मराठी सरदार व तत्सम प्रजा राजाइतपत मान देण्यास किंचित् नाखूष असत. आपल्या अधिकारात महाराजानी बहाल केलेली इनामे भोगण्यास लोक काकू करीत. स्वतः राजा नसल्याने त्याना तह वगैरे करिता येत नसत. शिवाजीमहाराजाना बादशहाने बण्डखोर ह्मणून मानले असल्याने महाराजांची बाजू उघड रीतीने घेण्यास लोक वचकत असत. कित्येक विचारी मुत्सद्दी व सरदार ह्मणू लागले होते की, 'महाराजानी आता स्वराज्य व हिन्दजनता यांचे रक्षणार्थ स्वतःला रीतसर राज्याभिषेक करवून घेऊन हिन्दवी स्वराज्याचा स्थापना करावी' अशा रीतीने गरिबापासून ते थेट श्रीमन्तापर्यन्त (थोडे विरोध सोडून) सर्वांचे विचार एकाच प्रणालिकेतून वहात होते. ही सर्व परिस्थिती लक्षात घेऊन व हिन्दूंच्या धार्मिक पिण्डप्रकृतीच्या सन्तोषार्थ स्वतःला राज्याभिषेक करवून घेऊन पायाशुद्ध हिन्दवी स्वराज्य स्थापनेचा उच्च विचार बाळाजी आवजीच्या सल्ल्याने व मातोश्री जिजाबाई यांचे सम्मतीने महाराजानी केला, यात त्यांचा यत्किन्चित्‌ही स्वार्थ नसून स्वराज्य संवर्धनाची कळकळ मात्र दिसून येते. हा एक राजकारणातील डाव होता.

राज्याभिषेक करवून घ्यावयाचे ठरले पण काही प्रतिष्ठीत महाराष्ट्रीय ब्राह्मण महाराजाना क्षत्रिय म्हणण्यास कबूल होईनात व राज्यावर बसण्याचा अधिकार फक्त द्विजानाच (क्षत्रिय, ब्राह्मण व वैश्य!). कलियुगात फक्त २ जाती एक ब्राम्हण बाकी सर्व शूद्र. मग महाराजाना राज्याभिषेक कसा करावयाचा? अर्थात् यवन बादशहाचे पुढे हे सर्व लोक आपल्या माना लववीत हे निराळे. कुऱ्हाडीचा दाण्डा गोतास काळ ही म्हण त्यावेळेस नेमकी प्रत्ययास आली.

आपण उच्च कुळीचे मराठे असून खरे क्षत्रिय आहो हे सिद्ध करण्यासाठी जयपुरहून वंशवेल आणून आपण शिसोदेवंशीय आहोत ही खात्री पटविली तरी कित्येक महाराष्ट्रीय विद्वान् ब्राह्मण आपला दुराग्रह सोडीनात. तेवढ्या करता काशीहून गागाभट्टास पाचारण करणे भाग पडले. आजकाल सर्व लोक कितीजरी महाराजाना डोकीवर घेऊन नाचले, त्यांच्या शुद्ध क्षत्रियत्वाची दौण्डी कन्याकुमारीपासून काश्मीरपर्यन्त पिटवली तरी त्यावेळी महाराजाना काय काय यातना, छळ, अपमान सोसावे लागले याची कल्पनाच करवत नाही. श्रीशिवछत्रपतींच्या वंशजाच्या घराण्यात वेदोक्त कर्म करण्याचे साफ नाकारणारे राजोपाध्ये व त्यांच्या धैर्याची मुक्तकण्ठाने प्रसंशा करणारे डॉ. केतकरासारखे विद्वान्, तसेच तंजावरच्या 'शूद्र' जज्जानी शिवाजीमहाराजांच्या वंशाना 'शूद्र' ठरविल्याने आनन्दाने बेहोष होऊन नाचणारे बोडस जर हल्लीच्या सुशिक्षित समाजात सापडतात तर त्यावेळी महाराजांना 'वेदोक्त' राज्याभिषेक करवून घेण्याला किती त्रास पडला असेल याचा विचार सूज्ञ वाचकानीच करावा पण एवढ्यातेवढ्याने महाराज डरणारे नव्हते. त्यानी वे. शा. सं. गागाभट्टास आणले. पण "राज्याभिषेकाचे वेळेस लागणारे मंत्र गागाभट्ट म्हणेना सबब राजकीय धोरण त्यापुढे माण्डावे लागले." (मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष पृ. १६३) याचे कारण त्यावेळी लोक महाराजाना क्षत्रिय मानण्यास तयार नव्हते, "गागाभट्ट बनारसहून आणला होता त्याजकडून शिवाजीने वेदमन्त्र शिकून ब्राह्मणासारखे आचरण करण्यास सुरवात केली यावरून सर्व ब्राह्मणानी गागाभट्टावर बहिष्कार घातला." (सरदेसाईकृत मराठी रियासत पृष्ठ ४९४) परन्तु शेवटी महाराजांच्या स्वीकृत कार्याने दिपून गेल्याने व त्यांच्या आत्मतेजाने सर्व विरोधकांचे विरोध वन्ध्य ठरले.

राज्याभिषेक विधीच्या माहितीकरिता पण्डितानी अनेक महाकाव्ये व ग्रन्थ धुण्डाळले. उदेपूर व जयपूरच्या राजघराण्यातील चालू विधींची माहिती मिळवून आणली. राज्याभिषेकार्थ सागराचे जलकुम्भ आणले होते. त्यावेळेस स्वर्गातील पुष्करमालिनीसभेपेक्षा रायगडावर अत्यन्त मोठा थाट उडाला होता. या समारम्भास ५०,००० हजार ब्राह्मण हजर होते व ते सम्पूर्ण ४ महिने रोज पंचपक्वान्ने खात महाराजांचा पाहुणचार यथास्थित घेत होते.

गागाभट्टाने महाराजांच्या क्षत्रियत्वास मान्यता दिली महाराजांच्या आज्ञेने वेदोक्त विधी करण्याचे गागाभट्टाने कबूल केले. तारीख २८ मे १६७४ रोजी मौन्जीबन्धनाचा विधी सुरू झाला. गागाभट्ट वेदोक्त मन्त्र ह्मणावयास लागल्याबरोबर तिथे जमलेल्या ब्राह्मणानी 'नन्दान्तम् क्षत्रियकुलम्' अशी एकच आरोळी ठोकून वेदोक्त विधी करण्यास आयत्या वेळेस अडथळा केला. एवढा मोठा विद्वान् गागाभट्ट पण तोहि आयत्या वेळेस त्या ब्राह्मणापुढे गडबडला व वेदोक्त विधी गाळून त्याने तो समारम्भ साजरा केला.

शके १५९६ ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीच्या मङ्गल प्रभातकाली महाराज, अष्टप्रधान व लेखकद्वय यानी मङ्गलस्नान केले. त्यानन्तर मृत्तिकास्नान, पंचगव्यस्नान, गङ्गादितीर्थोदकस्नान यथाविधी करून सर्वांनी शुभ्र वस्त्रे, गन्ध, पुष्पे व अलङ्कार धारण केले. सुवर्णाने मढविलेल्या रत्नखचित सिंहासनावर महाराज बसले. त्यावेळी त्यांची पट्टराणी सोयराबाई पटबन्धन करून जवळ बसली. राजकुमार सम्भाजीमहाराज यानाहि जवळ बसविले. अष्टदिशेस अष्टप्रधान घृतदुग्धपूर्ण सुवर्णाचे व ताम्ब्याचे कलश घेऊन उभे होते. सन्मुख सव्यभागी पत्रलेखक बाळाजी आवजी उभे होते. कोशाध्यक्ष, शालाध्यक्ष, सरदार, माण्डलीक राजे हे सर्व आपापल्या योग्यतेनुरूप उभे होते. चित्रगुप्त लिहितो "तदनन्तर अष्टभागी कलशास

सुवर्णाचे ताम्वे केले व सम्पूर्ण सिद्ध ब्राह्मण वेदस्मृतिपारङ्गत तपोतेजस्वी अपरसूर्य, भानु, शापादपि शरादपि ब्राह्मणानी व अष्टप्रधान यानी आम्रपर्ण संयुक्त उदक सुवर्ण कलशी भरून राजे यांचे वेदोक्त मन्त्रेकरून मस्तकी अभिषेक केला " ( चि० शि० म. वरून पा० १०० ). या मङ्गलकाली मोरोपन्तानी अभिषेक केला. हणमन्त्यानी पवित्र जलसिंचन केले, गागाभट्टजीनी मन्त्र म्हटले व हजारो लोकानी आशिर्वाद देऊन आपली पूर्ण सम्मती जाहीर केली.

विधी आटोपल्यावर महाराजानी पुन्हा मङ्गलस्नान केले. सुवासिनीनी आरत्या केल्या. ब्राह्मणाना सुवर्ण दक्षिणा वाटल्या सुमुहूर्तावर महाराज सिंहासनावर बसल्यावर ' गागाभट्टाने स्वतः मोत्यांच्या झालरीचे छत्र महाराजावर धरून शिवछत्रपतींचा विजय असो अशी घोषणा केली तोफांची सलामी झाली. सरदार मानकरी यांचा बहुमान केला. त्यांच्या योग्यतेप्रमाणे त्याना वस्त्रालङ्कार देऊन गौरवाने निरोप दिले. या प्रसङ्गी गोरगरीबाना महाराजानी अलोट दान दिले. सभासद म्हणतो की शिवाजी महाराजानी यावेळी एक कोट बेचाळीस लक्ष होन ( १ होन = ५ रुपये ) दानधर्म केले. त्यावेळेचे ते वैभव पाहून अनेकानी आश्चर्योद्गार काढलेले अनेक ग्रन्थात नमूद आहेत.

# शरीर-सौन्दर्य

हल्लीच्या भौतिक युगात मानवाची झालेली प्रगति पाहून अचम्बा वाटल्यास नवल नाही. आजच्यापेक्षा उद्याची सुधारणा काय होईल याची कल्पनाही करवत नाही. मनुष्याच्या महत्वाकाङ्क्षेने आकशाला गवसणी घालण्याचा उपक्रम सुरू केला आहे. प्रत्येक व्यक्तीला आपण स्वयम्पूर्ण, सर्वगुणसम्पन्न व्हावे अशी तीव्र उत्कण्ठा

लागून गेली आहे. हल्ली तरुणांची दुर्दमनीय आकाङ्क्षा पाहून जीर्णमतवादी हतबुद्ध झाले आहेत. तरुणतरुणींच्या अनेक आकाङ्क्षा-पैकी शरीरसौन्दर्य प्राप्त करून घेणे ही एक बलवत्तर आकाङ्क्षा आहे.

सिनेमायुगाला नुकतीच कुठे शहरात—सुरवात झाली आहे. सिनेमाचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष परिणाम प्रेक्षकावर होत असतो. सिनेमात आढळून येणारे नायकनायिकाचे शरीरसौन्दर्य आपल्या ठिकाणी असावे अशी प्रत्येक तरुणतरुणीस इच्छा असते. ती नाकबूल करून भागणार नाही. आपण शरीराने सुन्दर दिसावे ही प्रत्येकाची इच्छा असते पण सौन्दर्य आणि आरोग्य याचे अत्यन्त साहचर्य असते याची जाणीव मात्र कुणालाच नसते. आपण ज्याना अगदी हीन लेखतो अशा, भिल्ल, कोळी, कैकाडी, गोण्ड जातीतील लोकांच्या ठिकाणी उत्कृष्ट शरीरसौन्दर्य आढळून येते. कातडीचा गोरेपणाचा जरी त्याच्या ठिकाणी अभाव असला तरी त्याच्या ठिकाणी सुन्दर शरीरसौष्ठव दिसून येते हे नाकबूल करून भागणार नाही. मुखाची ठेवण, नाक, डोळ, ओठ, कातडीचा रंग, केस हे अनुवंशिक व जातिविशिष्ट असलेले आढळून येतात. वस्तुतः हल्ली जातिसङ्कर फार झालेला आहे. प्रत्येक व्यक्तीला शारीरिक सौन्दर्य जन्मतःच लाभेल असा सम्भव फारच कमी. तरीपण आपण आहो त्यापेक्षा अधिक सुन्दर दिसावे ह्मणून प्रत्येक प्राणिमात्राची खटपट चाललेली असते. जगातील कोणत्याही राष्ट्रातील मनुष्य आपले सौन्दर्य कृत्रिम उपायानी वाढविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असतो. अर्थात् प्रत्यकाची सौन्दर्यविषयक कल्पना भिन्न भिन्न असते. तरी पण तरुणापासून वृद्धापर्यन्त सर्व स्त्रीपुरुष कृत्रिम साधनानी शारीरिक सौन्दर्य वाढविण्याची शिकस्त करतात. युरोप अमेरिकेत तर सौन्दर्यप्रसाधनाच्या अनेक वस्तू प्रत्यहि नवीन नवीन होत आहेत. आणि या धन्द्यावर तिकडील व्यापारी

लक्षाधीश झाले आहेत. आजकाल कृत्रिम उपायानी आपले सौन्दर्य वाढवावे व ते अधिक काल टिकावे म्हणून तिकडील तरुणींची कोण यातायात! अमेरिकेत तर सौन्दर्यप्रसाधनमन्दिराला २ कोट स्त्रिया नित्य न चुकता भेट देत असतात. याकामी त्यांचा दररोज १५ लक्ष डॉलर्स (४७ लाख रुपये) खर्च होतो. याचे लोण नुकतेच हिन्दुस्थानातहि येऊन पोहोचले आहे. वृत्त-पत्रातून अथवा मासिकात प्रत्यहि प्रसिद्ध होणाऱ्या जाहिराती पाहिल्या म्हणजे आपली खात्री पटेल. दररोज नवीन क्रीम्स्, फेस् पावडर्स, सुगन्धी तेले, लिप् स्टिक्स् उत्पन्न होत आहेत. मुखाचे सौन्दर्य वाढविणाऱ्या वस्तू दिवसानुदिवस हिन्दुस्थानात अधिकाधिक उत्पन्न होत आहेत. अशा वस्तूंच्या उपयोगाने सौन्दर्य वाढण्यापेक्षा ते आरोग्य राखल्याने अधिक वाढते याची जर प्रत्येकाला खात्री पटेल तर विनाकारण होणारा राष्ट्राच्या पैशाचा अपव्यय सहज थाम्बेल. न्यूयॉर्कच्या State Journal of Medicine चे सम्पादक लिहितात —

Every doctor can tell of beauty that has been brought back by restored health yet the big parade of women chasing beauty, passes the doctor's office by, and pours a flood of gold into the purses of the beauticians. If the truth could be implanted in womans's mind that there is no beauty like good health, the physician would have a truly golden opportiuity to improve the health of nation.

किती स्त्रीपुरुष वास्तविक आरोग्याचे नियम पाळत असतील? शरिरात असे कित्येक विषारी पदार्थ जातात की ते रक्तात भिनल्यामुळे तोण्डावर अथवा शरिरावर पुळया उठतात, शिवाय तोण्डावरील कातडीही खराब व राठ होते. हे विषारी पदार्थ रक्तात न भिनावे

ह्मणून योग्य व्यायामाची अत्यन्त आवश्यकता असते. पण इतक्या खोल नजरेने कोण या गोष्टीकडे पाहणार ? आरोग्याच्याद्वारे शारीरिक सौन्दर्य प्राप्त होते, इकडे कुणीही लक्ष देत नाही. फक्त बाह्य कृत्रिम साधनानी सौन्दर्य वाढविण्याचाच प्रयत्न केला जातो.

आपल्या शरिरातील स्नायूंची योग्य आणि सुन्दर वाढ व्हावी ह्मणून किती तरुण स्त्रीपुरुष नित्य व्यायाम घेतात ? पद्धतशीर खेळ व व्यायाम यामुळेच ग्रीक लोकानीं आपली शरिरे कसदार, व सुन्दर बनविली होती. आणि असे आदर्श डोळयापुढे असल्यामुळेच ग्रीक कलावन्तांच्या हातून अत्यन्त सुन्दर पुतळे निर्माण झाले. सिनेमात काम करणाऱ्या नटनटींना आपले शरीरसौष्ठव राखण्याकरता नित्य प्रत्येक अवयवाला योग्य व्यायाम घ्यावा लागतो. कृत्रिम उपायानी ते सौन्दर्य वाढविण्याचा शक्य तो प्रयत्न करीत नाहीत. वक्तशीर व्यायाम व योग्य सवयी यामुळेच ते आपल्या शरिराचे सौष्ठव व सौन्दर्य राखतात. फिल्म कम्पन्यांचे मालक व डायरेक्टर्सुद्धा त्यांच्यावर कडक देखरेख ठेवीत असतात. त्यांच्या वर्तनावर व दीनचर्येवर त्यांची कडक नजर असते; त्याना नियमांचे उल्लङ्घन मुळीच करून देत नाहीत. आणि ह्मणूनच त्याचे सौन्दर्य टिकून राहते. याच्याउलट हल्लीचा महाराष्ट्रीय तरुणसमाज बन्धनाच्या पलीकडे जाण्याची धडपड करीत आहे पण त्यातही पद्धतशीरपणा नाही.

कित्येक तरुण बायकी-नाजूक-दिसतात. अथवा कित्येक स्त्रिया पुरुषी दिसतात याना आदर्श स्त्रीपुरुष ह्मणता येणार नाही. हल्ली तरुणाना तर आपण नाजूक दिसावे असे फार फार वाटू लागले आहे. स्त्रियापेक्षा आपण नाजूक आहोत हे दाखविण्याकरता कृत्रिम साधनांचा ते सर्रहा उपयोग करतात. परन्तु असा बायकीपणा तरुणानी सोडून दिला पाहिजे. ज्याच्या योगाने अङ्गात चपळाई उत्पन्न होईल, स्नायूना सुन्दर आकार येईल, अवयवांचे ठिकाणी

कसदारपणा उत्पन्न होईल असे खेळ व नमस्कारादि व्यायाम प्रत्येक तरुणाने घेतले पाहिजेत. स्त्रियानीसुद्धा खेळ खेळले पाहिजेत, शारीरिक व्यायाम घेतला पाहिजे. मात्र त्यानी पुरुषी बनता कामा नये. स्त्रियाना अत्यन्त योग्य व्यायाम तोही शरीरसौष्ठवाच्या दृष्टीने ह्मणजे नृत्य हा होय. नृत्याने स्त्री व पुरुष यांच्या शरिराचे सौन्दर्य वाढते असा अनुभव आहे. स्त्रियाचे नृत्य पुरुषांच्या नृत्याहून वेगळे असते. जी. एस्. दत्त, आय्. सी. एस्. यानी बङ्गालप्रान्तात नुकताच नृत्यकलेचा उपक्रम सुरू केला आहे. तो अत्यन्त यशस्वी झाला असल्याचे आढळून आले आहे. नृत्यकलेने स्नायूना योग्य व्यायाम व वळण मिळते एवढेच नव्हे तर तरुणांच्या ठिकाणी पौरुष व स्त्रियांच्या ठिकाणी कोमलता व सौन्दर्य उत्पन्न करते. नृत्यकलेने तरुणांच्या ठिकाणी तरुणोचित धैर्य उत्पन्न होते हे कित्येकाना वदतोव्याघाताचे उदाहरण वाटण्याचा सम्भव आहे. पण वस्तुस्थिती अशी आहे हे त्यांच्या स्पष्ट निदर्शनास आणणे भाग आहे.

'नृत्यकला' ह्मटली की कित्येक सम्भावितांच्या कपाळाला आठ्या पडण्याचा सम्भव आहे. पण नृत्यकला ही फार प्राचीन काळी उच्च जातीच्या स्त्रियाना पूर्णपणे अवगत होती याबद्दल लागतील तेवढे पुरावे संस्कृत वाङ्मयातून काढून दाखविता येतील. मध्ययुगात काही विशिष्ट कारणामुळे या कलेला उच्च कुलात मज्जाव झाला. पण आता तरी या कलेकडे सुशिक्षितांचे लक्ष जावावयास पाहिजे आहे. सुशिक्षित तरुणींनी या कलेचा अभ्यास आपल्या शारीरिक सौन्दर्याची वाढ होण्याकरता अवश्य करावा. गाणे, चित्रकला इत्यादि कलांचा जसा तरुण स्त्रिया अभ्यास करतात तद्वत या नृत्यकलेचा जर दररोज तरुण सुशिक्षित स्त्रियाकडून व मुलीकडून अभ्यास केला जाईल तर कृत्रिम साधनांची त्याना सौन्दर्यवर्धनास मुळीच जरूर पडणार नाही.

भावी तरुणपिढीला शरीरसौष्ठव व शरीरसौन्दर्य जर राखण्याचे असेल तर योग्य व नियमित्त व्यायाम, योग्य आहार यांची आवश्यकता आहे. कृत्रिम साधनांचा काहीही उपयोग नाही. व्यायामात नृत्य-कलेला जर स्थान दिले तर त्यापासून तरुणाना व त्यातल्या त्यात तरुणीना अत्यन्त फायदा झाल्याखेरीज राहणार नाही.

## इतिहासाचे व्यापक क्षेत्र.

जगात किती अद्भुत घटना घडत असतात! सामान्य मनुष्य ती घटना पाहून विस्मयाने रोमान्चितच व्हावा! इतिहासाच्या अभ्यासकास या गोष्टी सांङ्गावयास नकोच. कोणी तरी व्यक्ती अथवा समाज एखाद्या नवीन विचाराच्या प्रसाराकरिता प्रयत्न सुरू करतो. पण त्याचा परिणाम मात्र एखाद्या नवीन राष्ट्राची व सैनिक समाजाची उत्पत्ती होण्यात होतो. कधी कधी सत्ताधारी ऐहिक वा राजकीय स्वार्थ साधण्याचा प्रयत्न करीत असता एका नव्या धर्माची उत्पत्ती झालेली आढळून येते. दोन राष्ट्रात एका प्रश्नावर रणे माजून युद्धाचा भडका उडतो तर त्याहून भिन्न अशा दुसऱ्याच प्रश्नावर समजून पटते नि शान्तता निर्माण होते! एखादा राजा मरण पावला तर त्याच्या वारसा प्रश्नावरून अन्तरराष्ट्रीय युद्ध सुरू व्हावे! कधी तर दोन तीन राष्ट्राच्या वादातून नवीन राष्ट्र जन्म पावलेले दिसून येते.

अनेक चळवळी काही निश्चित हेतू मनात धरून केल्या गेल्या पण त्यांचा शेवट मात्र निराळे परिणाम होण्यात झाला. व्यापाराची उन्नती व्हावी म्हणून केलेल्या प्रयत्नाचे फल साम्राज्यवादात झाले. धार्मिक विचार प्रसृत करण्याचा प्रयत्न केला गेल्याने राज्य-नाश झाल्याची उदाहरणेहि पुष्कळ आहेत. राजाच्या मनसोक्त एकतन्त्री अधिकाराना मर्यादा घालण्यासाठी केलेल्या प्रयत्नाना

सम्पूर्ण स्वातन्त्र्याचे फल आलेले आढळते. दोन राष्ट्राच्या भाण्डणात तिसरेच राष्ट्र फसले जाते व त्याचे तुकडे पाडून पहिली दोन राष्ट्रे गबर होतात !

मानवी जगाच्या इतिहासात अशा अपूर्व घटना घडत असलेल्या पाहून जर निरीक्षक, मनुष्याचा विकास वा ऱ्हास उन्नती वा अवनति याना निश्चित नियम नाहीत म्हणून म्हणू लागेल तर त्याबद्दल आश्चर्य मानण्याचे मुळीच कारण नाही ! अशी उदाहरणे कार्यकारण भावाला विरोधच नाहीत का करीत ? तत्त्वज्ञ म्हणतात 'कारणात्विना कार्यं न भवति.' विज्ञानशास्त्री म्हणतात प्रत्येक कार्याला कारण असतेच ! विज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, ज्योतिषशास्त्र वगैरे सर्व शास्त्रे हाच सिधान्त साङ्गतात प्रो. मॅक्स नॉर्डन विज्ञानाचे लक्षण साङ्गताना लिहितात- Science, in the most limited and only correct meaning of the word, is simply the knowledge of the causal connection of phenomena and of the universal natural laws which they express. विज्ञानाचे हे लक्षण इतिहासाला नाही लागू पडणार ? काय, इतिहासात कसलाच कार्यकारणभाव नाही ? काय, माणसाची कार्ये कसल्याच नियमाशिवाय घडत असतात ? एखाद्या जातीची उन्नती अथवा अवनति, धर्माचा अभ्युदय वा नाश, स्वातन्त्र्य अगर गुलामगिरी या गोष्टी काय आकस्मिक घडून येतात ? या घटना जर कारणाशिवाय होत असतील तर असा प्रश्न उद्भवेल की अखिल मानवजीवनाचा उद्देश काय ? मनुष्याने आपल्या उन्नतीकरता कोणकोणत्या नियमांचे पालन केले ? कोणत्या नियमित्त साधनाने राष्ट्राला आपली उन्नति करता येईल ? इतिहासात या प्रश्नांची उत्तरे नाहीत काय ?

फ्रीमॅन इतिहासाची व्याख्या करताना म्हणतो History is the

science of man in his charecter as a political being. इतिहास हा मनुष्याच्या राजनीतीचे शास्त्र आहे असे तो समजतो. या व्याख्येनेनुसार समाजाचे राजकीय (political) कार्य, राज्य-व्यंवस्था, अन्तर्जातीय तह, राज्याची उन्नति अथवा अवनति ह्मणजे इतिहास होय. या सर्व प्रश्नांचे उत्तर इतिहास देऊ शकेल की नाही याची शङ्काच वाटते. आणि इतिहास जर या सर्व प्रश्नांची उत्तरे देऊ शकत नाही तर असे कोणते शास्त्र आहे की ते यांचे उत्तर समाधानकारक रीतीने देऊ शकेल ? धर्मशास्त्र, योगशास्त्र, कामशास्त्र, भाषाशास्त्र, मानसशास्त्र, भौतिकशास्त्र, यापैकी कोणते शास्त्र यांचे उत्तर देऊ शकेल ? नाही ! खरे पाहिजे तर इतिहासच या सर्व प्रश्नांची उत्तरे देऊ शकेल. पण इतिहासाची व्याख्या फ्रीमॅनच्या व्याख्येपेक्षा व्यापक करावयास पाहिजे. जर इतिहासाचे क्षेत्र मानवाच्या राजकीय (political) प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष घटनापुरतेच मर्यादित केले तर या प्रश्नांची उत्तरे सापडणे कठीण ! ब्रिटिश विश्वकोशात इतिहासाचे लक्षण पुढील प्रमाणे दिले आहे.

It is evident that Freeman's definition of history as past politics is miserably inadequate. Political events are mere externals. History enters into every phase of activity and the economic forces which urge society alone are so much its subject as the political result. In short, the historical spirit of the age has invaded every field. " vol 13. Page 529.

ENCYCLOPEDIA BRITANNICA.

प्रसिद्ध जर्मन विद्वान् मॅक्स नॉर्डन इतिहासाच्या व्यापक क्षेत्राची चर्चा करताना आपल्या Interpretation of History या ग्रन्थात लिहितात. History, in the widest sense, is the

sum total of the episodes of the human struggle for existence. The definition hardly needs explanation. History is the record of all great & small, that man has done & suffered, all that he has thought, imagined and achieved within the limits of that natural and artificial environments into which he was born, in which he has to live and by which any satisfaction of his needs and impulses is conditioned ( Page 12. )

वरील विचारसरणीला अनुसरल्यास महाभारत व पुराणे ही इतिहासच ठरतील. या ग्रन्थामध्ये ब्रह्माण्डाच्या उत्पत्तीपासून ते स्थावर, जङ्गम, सर्व प्रकारची सृष्टितत्त्वे, देवऋषींचा संक्षिप्त परीचय, राजवंशाचे विवरण, धर्मशास्त्र, योगशास्त्र, आयुर्वेद, धनुर्वेद इत्यादि विविध शास्त्रांचे समालोचन आहे. वस्तुतः इतिहासाचे क्षेत्र फार विस्तृत आहे. ब्रिटिश विश्वकोशाने म्हणूनच म्हटले आहे Encyclopedia itself is history in the stricter and wider sense. एक प्रसिद्ध विद्वान् लिहितात. History is the particoloured garb of Humanity. केवळ पाश्चात्य विद्वानानीच फक्त यादृष्टीने विचार केला आहे असे नाही. भारतीय विद्वानानीहि याच दृष्टीने इतिहासाची व्यापक व्याख्या केली आहे. इतिहास या शद्बाचा अर्थच (इति + ह + आस) 'असे झाले' असा आहे. ज्या ज्या घटना झाल्या त्या सर्व – मग त्या आर्थिक, राजकीय ( political ), धार्मिक अथवा भौतिक कोणत्याहि असोत त्यांचा अन्तर्भाव इतिहासात होतो. चाणक्यसुद्धा आपल्या अर्थशास्त्रात लिहितात ' पुराणमितिवृत्तमाख्यायिकोदाहरणं धर्मशास्त्रं अर्थशास्त्रं चेतिहासः।' (केवळ राजनीतीच नव्हे तर धर्मशास्त्र व

अर्थशास्त्र आदि सर्व शास्त्रे इतिहासात अन्तर्गत होतात.) महाभारतातहि इतिहासाचे लक्षण फ्रीमॅनसारखे मर्यादित साङ्गितले नाही. त्यात म्हटले आहे —

पुण्यं पवित्रमायुष्यमितिहाससुरद्रूमम् ।
धर्ममूलं श्रुतिस्कंधं स्मृतिपुष्पमहाफलम् ॥

अर्थात् धर्म, श्रुति, स्मृतीपर्यन्त इतिहासाचे क्षेत्र व्यापक मानले आहे.

वरील विवेचन पटले असूनसुद्धा मोङ्गलकालीन इतिहासाचे नाव काढताच बाबर आणि राणासङ्ग यांच्या लढाईपासून बहादुरशहापर्यन्तचा राजकीय इतिहासच आपल्या डोळयापुढे उभा राहतो याचे कारण काय ?

आजकाल विशिष्टीकरणाचा ( specialisation ) प्रभाव इतिहासावरहि पडलेला आढळून येतो. यामुळे इतिहासाची विविध अङ्गे स्वतन्त्र शास्त्राच्या स्वरूपात खूप विकास पावली आहेत, त्यामुळे रहित (राहिलेल्या) इतिहासाचे क्षेत्र फारच सङ्कुचित झाले आहे. मानवाचे राजनैतिकजीवन, अन्तरराष्ट्रीयसम्बन्ध, युद्ध अथवा तह येथपर्यन्तच इतिहासाचे क्षेत्र मर्यादित झाले आहे. मानवाच्या कौटुम्बिक, सामाजिक, धार्मिक आणि तात्त्विक जीवनाचा राष्ट्रावर काय परिणाम होतो, अथवा इतिहासनिर्मितीत याचे काय स्थान आहे हा प्रश्न जणू काय समाजशास्त्र, धर्मशास्त्र अथवा वेदान्तशास्त्र यांच्याकडेच सोडावयास दिलेला आहे असे दिसते. शास्त्रांच्या अशा पृथक्करणामुळे व विषयक्षेत्राच्या या मर्यादितपणामुळे इतिहासशास्त्राचे पूर्णत्व नष्ट झाले आहे. प्रत्येक शास्त्र हे दुसऱ्यास साहाय्यक–पुरकच–असते. इतिहासतज्ज्ञास प्रत्येक शास्त्राचा पूर्ण परिचय असावयास पाहिजे. All the branches of knowledge if not actually branches of History, are its very closest allies असे एक इतिहासतज्ज्ञ लिहितो ते खोटे नाही.

प्रत्येक शास्त्राचा इतिहासाशी अत्यन्त निकटचा दाट सम्बन्ध आहे. विशिष्टीकरण ( specialisation ) आवश्यक असले तरी एकत्वाच्या दृष्टीचा त्याग करून त्याचे तुकडे पाडून भिन्नभिन्न विषय समजू लागलो यात मोठी चूक झाली आहे. विशिष्टीकरण हे वर्णनाची सुगमता व मानवाची असर्वज्ञता या कारणामुळे असणे जरूर असले तरी वस्तुतः कोणताच विषय पृथक् व स्वतन्त्रपणे अस्तित्वात असणे शक्य नाही !

आणखी एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे ती ही की मनुष्य हा निव्वळ राजनैतिक प्राणी नाही. तसेच तो केवळ धार्मिक अथवा आर्थिकहि प्राणी नाही. अनेक इतिहास लेखकानी मनुष्य हा धार्मिक प्राणी समजून इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केला तर कित्येकानी मानसशास्त्र हाच इतिहासाचा आधार मानला आहे. हे सर्व दृष्टिकोन सत्य असूनहि अपूर्ण आहेत. सॅलियर्मन हा प्रसिद्ध इतिहासकार लिहितो There is no economic man, just as there is no theologicalt man. The merchant has family ties, just as the clergyman has an appetite.

इतिहासात जीवनशास्त्राचे ( Biology ) विशेष स्थान आहे. मानवप्राणी हा सृष्टीच्या सुरवातीपासून कोणकोणत्या परिस्थितीतून गेला, त्याच्यात केव्हा केव्हा आणि कसकसे परिवर्तन झाले व पुढे काय काय होणे सम्भवनीय आहे या सर्वांचे विवेचन मानवी इतिहासास आवश्यक आहे. भूगोलाचे ज्ञान इतिहासकारास सत्य-शोधनार्थ अत्यन्त जरूरीचे असते. मनुष्य हा कोणकोणत्या भौगोलिक परिस्थितीने घेरला गेला आहे या गोष्टीचे फार महत्व आहे. जल, वायु, प्रकाश इत्यादि तत्वाचा मनुष्याच्या गति, व्यवहार, स्वभाव इत्यादीवर दाट प्रभाव पडलेला असतो. शाकाहारी अथवा मांसाहारी प्राण्यांची ठेवण, रूप, रक्त, स्वभाव, शील वगैरे बाबतीत

त्यांच्या भिन्न परिस्थितीप्रमाणे भिन्नता असलेली आढळून येते. भूमिचर आणि जलचर प्राण्यांच्या जीवनात अथवा शरीररचनेत फरक असतो याचे कारणहि भिन्न परिस्थितीच होय! वनस्पतीच्या रचनेतील फरकाचे कारणहि हेच आहे. Essence of Christianity या ग्रन्थाचे प्रसिद्ध लेखक (Fewerbach) फ्यूरबॅश या कल्पनेचे दाण्डगे प्रचारक आहेत. त्यांच्या मते मनुष्य व निसर्ग याखेरीज कोणतीच दुसरी वस्तू वास्तविक नाही. धर्म हा मानवप्रणित आहे. इतिहासाच्या निर्मितीत धर्मास स्थान नाही. मानवाचे अन्नच त्याच्या विचाराचे व पर्यायाने त्याच्या धर्माचे–तत्त्वज्ञानाचे–उत्पत्तिकारण आहे. Man is what he eats अथवा 'अन्नमयं हि मनः' हेच खरे. मॉण्टेस्क्यू व बकले हे सुद्धा या विचाराना पुष्टी देतात. मॅक्कॉफ नावाचा रशियन पण्डित मानवाच्या इतिहास निर्मितीत नदीच्या प्रभावास महत्व देतो. नद्यांच्या किनाऱ्यावरच आमच्या पूर्वजानी आपली संस्कृती उभारली नाही कां? लाहोर, बनारस, हरिद्वार, कानपूर, प्रयाग, दिल्ली ही नगरे नद्याच्या काठावरच नाहीत का? जगाच्या आर्थिक इतिहासात त्यांचा प्रत्यक्ष सम्बन्ध आहे. कित्येक देशाच्या इतिहासनिर्मितीत समुद्रानेहि भाग घेतलेला आढळतो. भारतवर्ष व रोम यांची प्राचीन स्थिती, इङ्ग्लण्ड, जपान, हॉलण्ड याची अर्वाचीन परिस्थिती यावर समुद्राचा प्रचण्ड प्रभाव पडलेला नाही का दिसून येत? काही देशातील लोकांच्या आचारविचारात पर्वतांच्या सान्निध्याचा परिणाम झालेला आढळून येतो. डोङ्गराळ प्रान्तात राहणारे लोक स्वभावतः काटक, पराक्रमी, स्वावलम्बी आणि स्वतन्त्रताप्रिय असतात. उष्ण अथवा दमट देशातील हवामानाचा परिणाम त्या देशातील लोकावर होत असतो. याच आधारावर बकलेने आपल्या The Wages Fund च्या सिद्धान्ताची उभारणी केली आहे. कार्बन आणि ऑक्सिजन

हे अन्नातील दोन प्रमुख घटक आहेत. थण्डप्रदेशातील भोजन कार्बनप्रधान असते आणि हे भोजन व्यंजनप्रधान भोजनाहून महाग पडते. रोजमुरा हा लोकसङ्ख्या आणि सुबत्ता यावर अवलम्बून असतो. परंतु लोकसङ्ख्याहि अन्नाच्या उपलब्धीवर अवलम्बून असते. शीतप्रदेशात अन्नाच्या महागाईमुळे लोकसङ्ख्या कमी होते व त्यामुळे रोजमुरा अधिक मिळतो. शीतप्रधान इङ्ग्लण्ड व उष्णताप्रधान हिन्दुस्थान यामध्ये पगाराचे अन्तर (रोजमुऱ्यातील फरक) वरील विधानाला पुष्टीच देतात. बकले याच सिद्धान्त द्वारे जगातील आर्थिक स्थितीवर प्रकाश पाडतो. पण निव्वळ नैसर्गिक परिस्थितीच इतिहास निर्माण करते असे बकलेहि म्हणत नाही. भौतिक वातावरणाबरोबरच मानसिक आणि सामाजिक वातावरणहि मनुष्यावर परिणाम करते. The measure of civilization is the triumph of the mind over external agents, it becomes clear that of the two classes of laws which regulate the progress of mankind, the mental class is more important than the physical (History of civilization Page 156-157.) विविध परिस्थितीमध्येहि - मग त्या सामाजिक, राजकीय अथवा नैसर्गिक असोत-मनुष्य आपले व्यक्तित्व कायम राखण्याचा प्रयत्न करीत असतानाच भिन्न भिन्न मार्गांचे अवलम्बन करीत असतो. परिस्थितीत व जीवनसङ्ग्रामात बदल झाला की मनुष्यही आपल्या आचारात व नीतीत फरक करीत असतो. मानवी समाजाला नियमित करणाऱ्या अनेक शक्ती सारख्या कार्य करीत आहेत. जगत् निर्माण करणाऱ्या हजारो शक्ती त्याच्या भाग्यनिर्मितीत हातभार लावीत असतात.

एका जातीच्या उन्नति अथवा अवनतीवर सम्पूर्ण मानवजातीच्या विकासाचा अप्रत्यक्ष परिणाम घडत असतो. ज्या एखाद्या गोष्टीमुळे

एखाद्या विशिष्ट जातीची उन्नति घडते ती गोष्ट ही मानवजातीच्या साधारण प्रगतीपैकी एक घटना असते. एक काळचे राष्ट्रीय अथवा सामाजिक आन्दोलन तत्कालीन जगातील परिस्थितीची कल्पना देऊ शकेल. कोणत्याही एखाद्या समाजाचे अथवा राष्ट्राचे वैभव अथवा दारिद्य, उन्नति अथवा अवनति, स्वतन्त्रता अथवा गुलामगिरी यावर तत्कालीन जगातील सर्व शक्तीचा परिणाम घडत असतो. एका देशातील इतिहासाचा अभ्यास करताना सर्व देशातील इतिहासांचा व जगातील विविध शक्तीमधील परस्पर सङ्घर्षाचा अभ्यास करणे आवश्यक आहे.



# शशाङ्क-साहित्य

## मुद्रित

१ मालती (काव्य-सङ्ग्रह)
२ भारतीय चित्रकला (प्रबन्ध)
३ शशिकला (नाटिका)
४ त्याग (नाटिका)
५ मरीचिका (गद्यकाव्य-सङ्ग्रह)
६ कलातरङ्ग (निबन्ध-सङ्ग्रह)
७ वर्तिका (गद्यकाव्य-सङ्ग्रह)
८ झङ्काराचे पडसाद (निबन्ध-सङ्ग्रह)

## मुद्रणगत

९ हलत्या सावल्या (निबन्ध-सङ्ग्रह)

## अमुद्रित

१० भारतीय नृत्यकला (प्रबन्ध)
११ ज्योति (गद्यकाव्य-सङ्ग्रह)
१२ आकाशफुले (कथा-सङ्ग्रह)